एका कर्तृत्वशालि स्त्रीचें चरित्र.

लेखिका :

हेलन डोअर बॉयल्स्टन

अनुवाद :

विजय तेंडुलकर

नव-लेखन : क्रमांक दोन.



# १

वाढदिवसाचा चांगला एवढा केक एका बुटक्या मेजावर ठेवला होता. जवळ तीन वर्षे (पूर्ण) वयाची क्लारा बार्टन उभी होती. पिंगट टपोऱ्या डोळ्यांची, लहान चणीची चिमुरडी. तिचा पोशाख लाल होता, बूट लाल होते, मोजे लाल होते. उल्हासानें तिचे पिंगट, टपोरे डोळे चमकत होते. तिचा वाढदिवस होता. तो केक ती कापणार होती, सर्वांना त्यांतले वांटे देणार होती. तिला तीन वर्षे पूर्ण झाल्यानिमित्त.

हातांत थाळया घेऊन तिच्या कुटुंबांतलीं माणसें एका रांगेंत सस्मित उभीं होतीं. तिचे वडील, तिची आई, तिची ताई डोरोथी, तिचे भाऊ स्टीफन आणि डेविड, आणि तिची डोरोथीपेक्षां धाकटी बहीण सॅली. (ही तिच्याहून दहा वर्षांनीं मोठी होती.) रांगेंत सर्वांत शेवटीं क्लाराचा सुरेख, शुभ्र कुत्रा बटन, उताविळीनें शेपटी जोरजोरानें हलवीत, आपल्या

चकचकत्या इटुकल्या डोळ्यांनीं क्लाराकडे पहात अस्वस्थपणें पण तसा विश्वासानें उभा होता.

त्याचा विश्वास अस्थानी नव्हता. सगळ्यांना त्यांचे वांटे मिळाल्या-वर त्यालाही केकचा एक तुकडा मिळाला आणि तो त्यानें एका घांसांत गडप केला. आणि पुन्हा तो सज्जनपणें, गरीब मुद्रेनें उभा राहिला.

" त्यानं मला ' थँक्स ' कां म्हटलं नाहीं ? " क्लारा रागारागानें आईला विचारीत होती. "बाकी सगळ्यांनीं म्हटलं आणि मग हाच कोण असा लागून गेला ? "

सगळीं हंसलीं. आतां यानंतर पुढें काय होणार हें सर्वांना दिसत होतें.

क्लारा आपल्या वांटणीचा केक घेण्यासाठीं मेजाकडे वळली आणि तिच्या मुद्रेवरचा उल्हास पळाला. आश्चर्य उमटलें. ती गोंधळली, खडतुसली. केकच उरला नव्हता. आपल्यासाठीं केकचा तुकडा राखून ठेवायला ती विसरली होती !

असें होण्याची ही पहिली वेळ नव्हती. प्रथम असें झालें तेव्हां सारे म्हणाले होते, " माझ्या वांटणीचा घे, क्लारा ! " परंतु क्लाराच्या आईनें याला विरोध केला होता.

" तसं नको. " ती म्हणाली होती. " एकदां दिलेली वस्तु तिनं अशी परत घेतां कामा नये. एकदां जें केलं त्यालाच चिकटून रहायला तिनं शिकलं पाहिजे. "

सारे भयानें स्तब्ध झाले होते. क्लाराला तिच्या वाढदिवसाचा केकच मिळणार नाहीं तर मग !

पण क्लाराची आई पुढें म्हणाली होती, " तिच्याशीं हवा तर कुणी आपला तुकडा वांटून घ्या. तें चालेल. "

एकदां जें म्हटलें, केलें, त्याला चिकटून रहायला क्लारा खरोखरच पुढें शिकली. परंतु आपल्याजवळचें सारेंच देऊं नये हें मात्र ती कधींच

शिकली नाहीं. दर वेळीं तिनें पहावें तो तिच्यासाठीं अखेर कांहींच उरलेलें नसे. हें असेंच होत असे.

तिचें नांव खरें क्लारा नव्हे. तिचें नांव क्लारिसा–क्लारिसा हार्लो बार्टन. क्लारिसा हें मुळांत तिच्या मावशीचें नांव. तिच्या मावशीचें नांव ठेवण्याच्या काळीं कुठल्या तरी एका लोकप्रिय कादंबरीच्या नायिकेचें नांव हें होतें; म्हणून तें तिच्या मावशीला–आणि म्हणून तिला-ठेवण्यांत आलें. तिला स्वतःला हें नांव लांबणवजा वाटे, क्लिष्ट वाटे. म्हणून, बोलता येऊं लागल्याबरोबर, तिनेंच तें 'क्लारा' असें उच्चारायला सुरुवात केली.

१८२१ च्या क्रिसमसमध्यें तिचा जन्म झाला. ऑक्सफर्ड, मॅसाच्युसेट्स् हें तिचें जन्मस्थान. तिथली तिच्या वडिलांची शेतीवाडी बरीच मोठी होती. हक्काचें प्रशस्त घर होतें. त्या कुटुंबाला फार खपावें लागे—पण बदल्यांत कसली काळजीही नव्हती, सुबत्ता होती. क्लाराच्या जन्मानें साऱ्यांनाच आनंद झाला. असें कोणी त्यांना तेव्हां हवेंच होतें–एवढें एवढें, गोंडस, गोजिरवाणें, गोड गोड हंसणारें आणि आपल्या लीलांनीं हंसविणारें.

तिच्या भावंडांची तर ती फार लाडकी बनली. विशेषतः तिच्या भावाचा, स्टीफनचा तिच्यावर विलक्षण जीव जडला. प्रदीर्घ काळानंतर प्रौढपणीं तिनें म्हटल्याप्रमाणें, तिला बालवयाच्या काळांत एकूण सहा पालक होते. ज्याला त्याला वाटे कीं आपण या मुलीला एका विशिष्ट पद्धतीनें वाढवली पाहिजे. विशिष्ट वळण हिला लावलें पाहिजे. आपल्या डोक्यांतली ही 'पद्धत,' हें 'वळण,' प्रत्येकाला फार महत्त्वाचें वाटे आणि त्याच्या अंमलबजावणीसाठीं प्रत्येकाचा अट्टाहास चाले. क्लारा अशा परिस्थितींत वाढली.

तिची ताई डोरोथी मास्तरीणबाई झाली होती. क्लारा तीन वर्षांची होण्यापूर्वींच तिनें तिला लिहायवाचायला शिकविलें. स्टीफननें तिचे फार लाड करून तिला लाडावलें परंतु त्याबरोबर गणिताचेही धडे दिले. तिला नीट चालता येण्यापूर्वीं डेविडनें तिला अश्वारोहण शिकविलें. याच वयांत,

आश्चर्य म्हणजे, क्लारा सुतारकामही शिकली. मास्तरीणबाई व्हायच्या तयारींत असलेल्या सॅलीनें तिला जमाखर्च शिकवला. क्लारा जरा मोठी झाली तशी तिच्या आईनें तिला घरकामांत हाताशीं घेतली, शिवणकामाशीं तिचा परिचय करून दिला. वडिलांनीं—कॅप्टन स्टीफन बार्टननीं—आपल्या या शेंडेनक्षत्राला लष्करी डांवपेंच शिकविले. क्लारासारख्या लहान मुलीला वास्तविक हें काय उपयोगाचें ? परंतु विलक्षण मन लावून ती हा प्रकार वडिलांपाशीं शिकली. वडिलांपासून तिनें आणखी एक गोष्ट घेतली—हृदयाचा मोठेपणा. उमदेपणा, माणुसकी.

दर दिवशीं संध्याकाळची ती शेकोटीपाशीं वडिलांच्या मांडीवर बसून ते सांगत त्या लढाईच्या रोमहर्षक आठवणी मन लावून ऐकायची. लष्करी हुद्दे तिला पाठ झाले. पायदळ, घोडदळ आणि तोफखान्याबद्दलचे सारे तपशील तिनें मुखोद्गत केले. तिच्या वडिलांबरोबर ती धान्याच्या दाण्यांचीं सैन्यें जमवून लढाया करीत असे.

दिवसांतून दहा बारा वेळा तरी ती आईला म्हणे, "मी लढाईवर जाणार. मी सैनिक होणार. मी युद्ध करणार." रात्रीं वडिलांना ती न चुकता म्हणे, "बाबा, लढाईची गोष्ट सांगा ना मला."

आपल्या मुलीची सहा जणांच्या सहा मतांत आणि आवडीनिवडींत ओढाताण चालली आहे, तिच्यावर चमत्कारिक, परस्परविरुद्ध संस्कार होत आहेत, हें मिसेस बार्टनना केव्हां समजलें, कोण जाणे. पण त्या एकदां एका परिचिताकडे म्हणाल्या सुद्धां कीं, "त्या मानानें पोर बरीच उजवी राहिली आहे. कशी कोण जाणे."

वडिलांनीं समजावून सांगितलेल्या लढायांच्या हकिकती आणि वडिलांबरोबर खेळलेल्या लुटुपुटुच्या लढायांचा क्लाराला मोठेपणीं युद्ध-क्षेत्रावर उपयोग झाला यांत शंका नाहीं. तसेंच अश्वारोहणाची कला चांगली अवगत असल्यानें शत्रूच्या हातीं ती कधींही सांपडली नाहीं.

छोट्या क्लाराच्या बाबतींत तिच्या आईवडिलांना एक काळजी मात्र होती. क्लाराचें काळीज सशाचें होतें. विजेचा गडगडाट, जोराचा वारा पाऊस,

सापकिरडू, काळोख, उग्र चेहऱ्याचे प्राणी आणि विशेषतः माणसांना क्लारा फार घाबरे. नवखा माणूस दिसला कीं तिची गाळण उडत असे. नवखें लहान मूल सुद्धां तिला सहन होत नसे. तोंडांतून शब्द उमटेनासा होई. अंगाला कंप सुटे. तिला शाळेंत घालण्याची वेळ आली तेव्हां ही खरी अडचण होऊन बसली.

शाळेंत तिला जरा उशीरा घालण्याचा विचार ठरता तर कदाचित् हीही अडचण तेवढी भासली नसती. परंतु ती जेमतेम चार वर्षांची असतांनाच स्टीफननें, तिच्या भावानें तिला खांद्यावर घेतली आणि बर्फाच्या शिडकाव्यांतून मैलभर दूर असलेल्या शाळेंत आणून दाखल केली. शाळा लहान होती—अगदीं एकच खोलीची होती. खूप मुलें भोंवती जमलीं. मास्तर आले. क्लारा भयानें अर्धी झाली. कुठें तरी धूम पळून जावें, उभ्या जागीं अदृश्य व्हावें, असें कांहींतरी तिला वाटलें. जीभ आंत ओढली. तोंडाला कोरड पडली. स्टीफननें तिला तिथें ठेवली आणि 'मागें हिचें कसें होणार' या चिंतेंतच तो निघून गेला.

एवढेंच बरें झालें कीं क्लाराचे मास्तर रिचर्ड स्टोन मोठे प्रेमळ, तरुण आणि स्वतःचीं मुलें असलेले गृहस्थ होते. अत्यंत मऊ, गोड सुरांत त्यांनीं छोट्या, रडवेल्या क्लाराला धीर दिला. तिची विचारपूस केली. तिला एका बांकावर बसायला लावलें. तिची भीति थोडीफार पळाल्याचें हेरून त्यांनीं तिला मूळाक्षरें म्हणायला लावलीं आणि क्लारानें तीं तोंडांतल्या तोंडांत म्हटलीं.

" आतां 'कॅट'चं स्पेलिंग सांगशील का तूं ? " त्यांनीं विचारलें.

क्लारा नुसती पहात राहिली. तिला तें स्पेलिंग येत नव्हतें. मग एकदम तिच्यांतला मानीपणा उसळून आला.

" मला तसलं स्पेलिंग येत नाहीं. " तिनें सांगितलें. मला 'आर्टि-चोक'चं स्पेलिंग येतं. "

मास्तरांना समजल कीं क्लाराला तीन सिलॅबल्सच्या शब्दांचींच स्पेलिंगें येत असलीं पाहिजेत; आणि तिच्या 'स्पेलिंग बुकां'त 'आर्टिचोक' हा

तीन सिलॅबल्सवाला पहिलाच शब्द असावा. क्लाराच्या या जबाबानें मास्तर चमकले. त्यांनीं चार वर्षांच्या क्लाराला एकदम तिसरींत घातली.

मास्तर आपल्यावर खूष झाले आहेत हें छोटी क्लारा समजली. ती जास्त धीट बनली. भीति पळाली. तरीसुद्धां इतर मुलांत मिसळण्याचा तिला संकोच वाटत होता, इतर मुलांबरोबर खेळायला ती कचरत होती. मुलें तिच्याकडे पाहून हंसलीं कीं तिला मनस्वी रडूं कोसळे.

पुढल्या वर्षी तिचे मास्तर स्वतःची खाजगी शाळा चालू करण्यासाठीं तिची शाळा सोडून गेले तरी क्लाराचा हा एकलकोंडेपणा, बुजरेपणा असाच कायम होता.

मास्तरांच्या जागीं आतां एक मास्तरीणबाई रुजू झाल्या. मिस् सुसन टोरे. या बाई मोठ्या देखण्या आणि तरुण होत्या. क्लारा तर त्यांना अगदीं भजूं लागली. परंतु या बाईंनाही क्लाराचा बुजरेपणा घालविता आला नाहीं. तिच्या स्वतःच्या बहिणींना, डोरोथी आणि सॅलीला या बुजरेपणाचा बंदोबस्त करणें जमलें नाहीं तर मग इतरांची गोष्टच कशाला ? या दोघी बहिणी क्लाराच्या शाळेंत क्लारालाच पुढें मास्तरीण म्हणून शिकवीत.

क्लारा आठ वर्षांची झाली. आतां तिच्या बुजऱ्या स्वभावावर कांहीं इलाज केलाच पाहिजे असें तिच्या आईवडिलांनीं आणि सर्वांनींच ठरविलें.

"पण हें नक्की आहे तरी काय, मी म्हणते ?" क्लाराची आई क्लाराच्या वडिलांना विचारी. "शाळेंत पोर घाबरून घाबरून असते— आणि इकडे पहावं तर तुमच्या सगळ्यांत थोराड घोड्यावर बसून मजेंत भटकून येते—लगाम नको, रिकीब नको, कांहीं नको. नुसती आयाळ पकडून चिकटलेली असते त्याच्या अंगाला ! कुठल्या मुलाला हें धाडस जमेल ?"

कॅप्टन बार्टन म्हणत, "समजत नाहीं मलासुद्धां, काय आहे तें. मला वाटतं घरापासून लांब एकाद्या बोर्डिंग स्कूलमध्यें ठेवली तिला तर होईल धीट. तिथं नवख्या, अनोळखी, अपरिचित माणसांची संवय होईल तिला."

घरापासून एक दिवसाचा प्रवास केला कीं अशी एक शाळा होती. तिथें मुलांची रहाण्याचीही व्यवस्था असे. ही शाळा होती क्लाराच्या जुन्या मास्तरांची—रिचर्ड स्टोन मास्तरांची. क्लाराचा स्वभाव त्यांना नवीन नव्हताच. क्लारालाही ते आवडलेले होते.

बरेच दिवस याबद्दल खल होऊन अखेर स्टोन मास्तरांच्या शाळेंत क्लाराची रहाण्याची आणि शिकण्याची व्यवस्था करण्यांत आली.

एप्रिलमधल्या एका कुंद दिवशीं, आठ वर्षांचीं क्लारा बार्टन, वडिलांच्या मांडीवर बसून, घर सोडून नव्या जीवनाकडे रवाना झाली.





## २

नवी शाळा प्रशस्त होती. नवी आणि नीटनेटकी होती. शिक्षक प्रेमळ होते. भोंवतालचीं मुलें स्नेहल होतीं. परंतु क्लारा विलक्षण उदास, विमनस्क होती. एक तर घरची उत्कट आठवण; आणि आपल्या हातून कांहीं गैर, कांहीं चुकीचें घडेल आणि आपण हास्यास्पद होऊं ही भीतीही. अभ्यासांत मात्र ती अद्याप तल्लख होती; पण यामुळें तिचा बुजरेपणा कमी होऊं शकत नव्हता. तिला इतरांसमोर जेवायचीही भीति वाटे. शाळेच्या वसतिगृहांतल्या लांबलचक मेजाशीं मुलें बसत आणि भरपूर जेवत. परंतु क्लारा अर्धपोटीं राही. समोर येई तें बहुतेक सारें 'नको' म्हणे. ती खंगली, फिक्कट दिसूं लागली, तिची उमेद मावळली.

क्लारा ही अशी अर्धपोटी रहाते हें लक्षांत येतांच स्टोन मास्तर स्वतः तिला वाढूं लागले. कितीही कडकडीत भूक लागलेली असली तरी क्लारा त्यांतल्या कशालाच हात लावीत नसे. तिच्या नकळत, परंतु तिनें असहकार, बहिष्कार पुकारला होता! आणि तो यशस्वी ठरला. अखेर एक दिवशीं तिचे वडील आले आणि तिला घरीं घेऊन गेले.

सगळयांनींच आतां क्लाराचा नाद सोडला होता. 'ही अशीच' हें

सगळयांनीं मान्य केलें होतें. क्लाराचें शिक्षण यानंतर घरींच होऊं लागलें. कधीं भाऊ बहिणी क्लाराचा अभ्यास घेत तर कधीं कांहीं खास विषया-साठीं ठेवलेले मास्तर तिला तो विषय शिकविण्यास येत. कांहीं वर्षे क्लारा घरबसल्या शिकली.

क्लारा वसतिगृहांतून वडिलांबरोबर घरीं परत आली त्या सुमारास तिच्या वडिलांचा एक पुतण्या वारला. त्याच्यामागें त्याची पत्नी आणि चार मुलें होतीं. या चारांत दोन मुलगे आणि दोन मुली होत्या. सहा ते तेरा वर्षांच्या दरम्यानचीं हीं चारही मुलें होतीं. क्लाराच्या वडिलांनीं आपल्या या पुतण्याची शेतीवाडी आपल्याकडे घेतली. क्लाराचे भाऊ तिची व्यवस्था तिथेंच राहून पाहूं लागले. एकदां क्लाराचे आईवडील क्लाराला घेऊन या नव्या इस्टेटीवरच्या जागेंत रहायला गेले. कॅप्टन बार्टननीं पुतण्याच्या बायकोला आणि मुलांना आपल्यासोबत रहायला बोलावून घेतलें.

यामुळें सगळयांचाच कांहीं ना कांहीं फायदा झाला. विशेषतः क्लाराचा तर फार फायदा झाला. आयुष्यांत प्रथमच समवयस्क मुलांत ती चोवीस तास राहूं लागली आणि स्वतःला नकळत त्यांच्यांतली एक बनली. तीं चारही मुलें मोठीं धीट आणि चळवळीं होतीं. क्लारा त्यांना आवडली, तिला त्यांनीं आपल्यांत सामावून घेतली. प्रत्येक गोष्टींत हीं पांचही मुलें एकत्र राहूं लागलीं.

याआधीं क्लारा कधीं घराबाहेर मोकळया हवेंत कुणाबरोबर खेळली बागडली नव्हती. आतां ती या चार मुलांबरोबर शर्यती खेळूं लागली, लपंडाव आणि शिवाशिवी खेळूं लागली, उंच आणि लांब उड्या मारूं लागली, झाडांवर चढूं लागली आणि नजीकच्या ओढ्यावरच्या लांकडाच्या ओंडक्यावरून बिनदिक्कत पलिकडे अलिकडे जाऊं येऊं लागली.

ती अंगानें सुधारली. दणकट बनली. तिचे गाल गुबगुबीत झाले, डोळयांत चमक आली. थकवा जाणवेनासा झाला. अनेक गोष्टींबद्दलची भीति नष्ट झाली. आणि एक दिवशीं तर तिचें तिनेंच ' मी नाचाच्या क्लासला जाऊं का ? ' म्हणून विचारलें.

तिच्या आईवडिलांना तिला नाच शिकविण्याला आनंद वाटला असता. त्यांचें कांहींच म्हणणें नव्हतें. परंतु त्यांचे शेजारीपाजारी आणि त्यांचें चर्च याविरुद्ध होतें. नाच अनैतिक मानण्यांत येई. पापकर्म मानण्यांत येई. या रूढ गैरसमजाविरुद्ध कांहीं करणें क्लाराच्या आई-वडिलांना जमण्यासारखें नव्हतें. त्यांनीं क्लाराला नकार दिला.

यामुळें क्लाराला केवढें वाईट वाटलें त्याची त्यांना कल्पना नव्हती. तिनें कुरकुर केली नाहीं. ती कांहींच बोलली नाहीं. परंतु मग अनेक रात्री ती एकटीच रडून रडून झोंपत असे. आपल्या पोरवयांतल्या स्वतंत्र उमेदीला बसलेली ही ठेंच क्लारा कधींही विसरली नाहीं. पुढें कित्येक वर्षें उलटलीं आणि लंडनमध्यें क्लारानें वयाच्या पन्नासाव्या वर्षीं नृत्यशिक्षक बोलवून नृत्यकलेची आपली हौस-जवळ जवळ सूडाच्या भावनेनें-पुरी करून घेतली. अर्थात त्या वयांतही तिनें त्या कलेंत बरीच प्रगति केल्याची नोंद आहे.

नृत्यकलेची उमेद ऐन बालवयांत मोडून काढली गेल्यानंतर क्लारा इतरत्र वळली. एका रविवारीं भल्या सकाळीं घरांतल्या चार मुलांनीं तिला खिडकीवाटें बाहेरून खडे मारून झोंपेंतून उठवली. आणि 'येत असलीस तर स्केटिंग शिकवतों' म्हणून गुपचूप सांगितलें. घरांतलीं सारीं मोठीं माणसें गाढ झोंपेंत होतीं. त्यामुळें कुणाला पत्ता लागला नसता.

असें बाहेर जाणें धर्मवचनाविरुद्ध असल्याचें क्लारानें वारंवार ऐकलें होतें. तरीही क्लारा बाहेर पळाली.

मुलांनीं तिच्या पायांना स्केट्स बांधल्या, तिच्या कमरेभोंवती स्कार्फ लपेटला आणि स्कार्फचें एकेक टोंक प्रत्येकानें हातीं घट्ट धरलें. स्केटिंग सुरूं झालें, क्लाराला सारीं पुढें पुढें ओढत नेऊं लागलीं. जमिनीवरचें बर्फ तेवढेंसें नितळ नव्हतें. नवीनच स्केटिंग शिकणाऱ्या क्लाराच्या मानानें तीं मुलें तिला जरा जास्तच वेगानें नेत होतीं क्लारा अडली, अडखळली आणि तोंडघशी आपटली. एक गुडघा चांगलाच फाटला, दुसरा बराच झाजरला. रक्तच रक्त झालें.

मुलांनीं हें एवढें रक्त कधींच पाहिलें नव्हतें. तीं घाबरलीं, गडबडलीं. क्लाराचे गुडघे त्यांनीं आपल्या अस्वच्छ स्कार्फनीं घट्ट बांधले. कुणीही घरीं काहीं सांगायचें नाहीं अशा आणाशपथा झाल्या. क्लारानें लंगडा-वयाचें नाहीं असेंही ठरलें.

न लंगडता चालण्याची क्लारानें शिकस्त केली. त्या काळांत मुली वापरीत तसल्या तिच्या पायघोळ झग्यामुळें गुडघ्यांचीं बँडेजेंही दिसत नव्हतीं. तो दिवसभर तिनें न लंगडता चालण्याचा बराच यशस्वी प्रयत्न केला. परंतु दुसऱ्या दिवशीं मात्र गुडघे सरळ होतांना भयंकर वेदना होत होत्या. सरळ चालण्याचा प्रयत्न करूनही क्लारा चांगलीच लंगडत होती. आईच्या लक्षांत आलें. तिनें क्लाराला हटकलें. प्रश्न केले. आपण पडल्याचें क्लारानें कबूल केलें. कुठें, कधीं, तें मात्र तिनें सांगितलें नाहीं. आपल्याला तसें फार लागलेलें नाहीं हें दाखविण्यासाठीं तिनें कमी दुख-णारा गुडघा आईपुढें केला.

स्कार्फ सोडून पहातांच त्या गुडघ्याची एकूण परिस्थिति पाहून तिच्या आईला धक्काच बसला. तिनें गुडघा चांगला धुतला, औषध लावून व्यवस्थित बांधला. दुसऱ्या गुडघ्याकडे तिनें पाहिलेंच नाहीं.

क्लाराच्या या मूर्खपणाचा परिणाम व्हायचा तोच झाला. तिचा तो दुसरा गुडघा, आणि मग सगळा पाय सपाटून सुजला, त्यांत पू झाला. पाय सणसणूं लागला. आणि त्यावर अखेर शस्त्रक्रिया करावी लागली. तीन आठवडे क्लारा बिछान्याला खिळून होती. या काळांत प्रत्येकजण तिची एवढी काळजी घेई कीं क्लाराला आपल्या लपवाछपवीची लाज वाटे. कुणासमोर रडूं कोसळेल कीं काय असें वाटे. ती मनोमन झुरत, कुढत राहिली. अखेर एक दिवशीं आई तिला म्हणाली,

"बरं का क्लारा, मी पण एकदां असंच आईबाबांना न विचारतां कांहींतरी केलं होतं."

"काय ?" क्लारानें संशयी मुद्रेनें पृच्छा केली.

"माझ्या बाबांची एक सुरेख, उमदी घोडी होती. मला नेहमीं वाटे.

कीं एकदां तिच्यावर बसून रुबाबांत दूर दूर फिरून यावं. अगदीं एकदांच ! पण बाबा मला त्या घोडीच्या आसपासही फिरकूं देत नसत."

" मग ? पुढें काय झालं ?"

क्लाराची आई मंद हंसली. "पुढें-पुढें मी एकदां आईबाबांच्या नकळत घोडीकडे गेले आणि तिला सोडून बसलें तिच्यावर."

" नाहीं नाहीं—"

" अग खरंच ! " आई म्हणाली—मुद्दामच मग गप्प राहिली.

" मग पुढें काय झालं तें सांग ना—" क्लारानें न रहावून विचारलें.

" घोड्यावरून पडलें मी." आईनें सांगितलें.

क्लाराच्या मनावरचा बराच भार एकदम कमी झाला.





## ३

क्लारा अकरा वर्षांची होईपर्यंत म्हणजे १८३२ पर्यंत तिचें एकूण आयुष्य संथपणें आणि चांगल्या प्रकारें गेलें. १८३२ त तिचा भाऊ डेविड छपरावरून पडला आणि त्याला बरेंच लागलें. क्लाराचा डेविडवर फार जीव होता—स्टीफननंतर ती डेविडवरच अत्यंत प्रेम करी. डेविडचें आयुष्य अशा प्रकारें धोक्यांत येतांच तिचें चित्त सैरभैर झालें. तिला कांहीं सुचेना. ती वेड्यागत वागूं लागली.

आणि आपल्या जखमी भावासाठीं आपण कांहीं करतों आहोंत असें तिला वाटूं लागलें तर ती पुन्हा थाऱ्यावर येईल या हिशेबानें तिच्या आईनें डेविडच्या सुश्रुषेसाठीं तिला हाताशीं घेतलें. आणि सर्वांच्या आश्चर्याचा विषय म्हणजे, क्लारा जणूं नर्सच्या पेशासाठींच जन्मल्यासारखी भावाची व्यवस्थित सुश्रुषा करूं लागली. डेविड लहान मुलासारखा तिची वाट पाहूं लागला, तिचें ऐकूं लागला, तिला बिलगूं लागला. त्याला काय हवें, काय वाटतें, कशानें त्याला आराम वाटेल, सारें सारें क्लाराला आपसुख समजे. ती त्याच्या डोक्याखालच्या उशा अशा ठेवी कीं त्याला बरें वाटे. ती अशा वेळींच आणि असेंच बोले कीं त्यामुळें डेविडची चित्तवृत्ति उल्हसित होई. त्याला इकडे तिकडे वळवतांना तिच्या इवल्या

हातांत अनुभवी नर्सचा कसलेपणा येई. भावापाशीं ती नेहमीं उल्हसित राही परंतु त्याला त्रास होईल असें कांहीं न करण्याची दक्षताही घेई.

हळूं हळूं त्याची सारी सुश्रुषा तीच करूं लागली. जळवासुद्धां लावूं लागली !

त्या काळीं जळवा कितीतरी व्याधींवर रामबाण मानल्या जात. या जळवा रोग्याच्या विशिष्ट अवयवांतलें, अवयवाच्या भागांतलें रक्त शोषून घेत. अपघाताच्या पेशंटवरही हाच उपाय श्रद्धेनें करण्यांत येई. आतांच्या काळांत आधींच रक्तस्रावानें क्षीण झालेल्या पेशंटचें रक्त जळवा लावून शोषून घ्यावयाचें कोणी म्हटलें तर लोक त्याला मारतील. पुन्हा ताकद भरायची असेल तर रक्त अंगांत हवेंच. उलट, आहे तें अपुरें वाटल्यास बाहेरचें भरण्यांत येतें.

त्या काळीं मात्र डोकेदुखी, थंडीताप, हाड मोडलेलें असणें, थकवा, फिट्‍ येणें, साऱ्यावर उपाय एक : जळवा—रक्तशोषण !

मोठ्या शिरा पकडून तेथें या जळवा लावण्यांत येत. या जळवा दिसायला काळ्या, तेलकट आणि घृणास्पद असत. जळूनें तिच्या प्रमाणांत जास्तींत जास्त रक्त शोषून घेतलें कीं ती आपोआप गळून पडत असे. मग तिला धरून बरणींत कोंडायची. ती नंतर पुन्हा उपयोगाला येत असे.

डेविड जवळ जवळ दोन वर्षें बिछान्यांत होता. दर दिवशीं त्याला जळवा लावण्यांत येत. तो अखेर सुधारला, बरा झाला, हेंच आश्चर्य !

डॉक्टरनीं क्लाराची सुश्रुषेंतली सफाई आणि तिचा चुणचुणीतपणा पाहून तिला जळवा कशा लावायच्या तेंहि शिकवून ठेवलें. एरवीं रक्ताच्या एका थेंबानें चक्कर करणाऱ्या क्लाराला आतां रक्तशोषणाचा हा उद्योग दर दिवशींच करावा लागूं लागला. रक्ताचें तिला कांहीं वाटेनासें झालें. हें सारें ती करत होती तें डेविडसाठीं.

तिच्या आईवडिलांनीं डेविडला सर्वस्वीं तिच्या हातीं कसा सोंपवला हा प्रश्न वेगळा; परंतु तब्बल दोन वर्षें क्लारा दिवसरात्र डेविडची काळजी घेत होती. डेविडपासून ती दूर जाई ती फक्त अश्वारोहणासाठीं. दहाव्या वाढदिवसानिमित्त वडिलांनीं घेऊन दिलेल्या बिली नांवाच्या घोड्यावरून ती रपेट मारून येई.

डेविड बरा झाला. तेरा वर्षांची झालेली क्लारा यानंतर हवी तशी स्वच्छंद वागायला मोकळी होती. परंतु ती तशी वागली नाहीं. ती उदास झाली. घुमी बनली. तिची कांति फिकुटली. कुडी रोडावली. वर वर ती एरवींसारखी सहास्य दिसत असली तरी तिला कशाचबद्दल कांहीं वाटेनासें झालें.

जवळ जवळ वर्षभर—म्हणजे फार दीर्घ काळ—ती अशा स्थितींत राहिली. त्या सुमारास तिच्या वडिलांच्या पदरचा एक माणूस देवीनें आजारी झाला. कुणी रोखण्यापूर्वींच क्लारा त्याच्या सुश्रुषेंत दाखल झाली. औदासीन्य पळालें. गाल पुनः गोबरे झाले. कांतीवर लाली चढली. भूक सपाटून लागूं लागली.

सर्व गांवभरच देवीची साथ पसरली आणि क्लारानें जास्त पेशंट्स स्वीकारले. तिलाही अर्थात् यामुळें देवी आल्या; पण ती त्यांतून लौकर बरी झाली आणि पुन्हां पेशंट्सच्या सुश्रुषेंत दाखल झाली.

हें सारं होत असतांना क्लाराच्या घरच्या मंडळीच्या प्रतिक्रिया मनोरंजक असतील. तिला हें सर्व करूं देण्यावांचून त्यांच्या हातीं कांहीं नव्हतें, क्लाराचें आयुष्यच 'बहुजन हिताय, बहुजन सुखाय' जायचें होतें. फक्त याचा साक्षात्कार अद्याप तिला स्वतःला झाला नव्हता. कुठल्या तरी एका ओढीनें ती सारं करीत होती, इतकेंच.

जें अनेक, अनेकानेक, असंख्यांसाठीं व्यतीत व्हायचें होतें त्याला प्रथम वाट सांपडली डेविडच्या रूपानें. मग गांवांतल्या कांहीं रुग्णाइतांपर्यंत त्याची मजल पोंचली. त्यानंतर शेंकडों अनाथ मुलांपर्यंत तें पोंचलें. त्यापुढें हजारों सैनिकांच्या सेवेंत तें धन्य झालें. आणि अखेर जगांतल्या कोट्यवधि दीन, दुःखी, दुबळे आणि पीडितांसाठीं चिरस्थायी असें कांहीं करून तें अमर झालें.

कोणीही क्लाराला अडवूं शकत नव्हतें, 'नको' म्हणूं शकत नव्हतें. सैन्याचे सेनापति, राज्यांचे राज्याधिपति, इतकेंच काय, अमेरिकेची सर्वशक्तिमान् कॉंग्रेसदेखील तिला—सदिच्छेपोटीं प्रयत्न करूनही—अडवूं शकली नाहीं.

त्यामुळें गांवांतल्या देवीच्या रोग्यांच्या क्लारानें चालविलेल्या सुश्रुषेआड तिच्या घरचें कोणी यशस्वी रीत्या येऊं शकलें नाहीं यांत कांहींच आश्चर्य नाहीं. मात्र सारीं अस्वस्थ झालीं असणार हें नक्कीं. क्लाराची वाढच थांबली होती. चौदाव्या वर्षी ती पांच फूट उंच होती—आयुष्यभर ती तेवढीच राहिली. या एवढाल्या स्त्रीनें साऱ्या जगाला गद्‌गदा हलविलें.





# ४

डेविडचा आजार आणि गांवांतली गोंवराची साथ यांनीं क्लाराच्या शिक्षणांत व्यत्ययच आला. क्लाराला शाळा आवडली नसली, शाळेमुळें येणाऱ्या अनेक अप्रिय गोष्टी तिला नको असल्या तरी तिला शिकायचें होतें, अभ्यास करायचा होता. आणि तो होत नाहीं हें तिलाही खुपत होतें—अगदीं घरांतल्या इतर माणसांइतकेंच. शिवाय शाळेंतल्या आणि त्यानंतरच्या आतेभावांबरोबरच्या वास्तव्याच्या काळानंतर आतां प्रथमच ती एकाकी पडल्यासारखी होती. तीं चार मुलें आणि त्यांची आई निघून गेली होती. स्टीफनचें आतां लग्न झालें होतें आणि तो आणि डेव्हिड आतां शेतीच्या व्यवस्थेच्या दृष्टीनें वेगळे राहूं लागले होते. सॅलीचेंहि लगीन होऊन ती सासरी गेली होती. डोरोथीला दुसऱ्या गांवीं नोकरी लागली होती म्हणून तीहि तिकडे.

घरीं सगळा शुकशुकाट होता. बरोबरीचीं मुलें खेळायला नाहींत, भाऊबहिणी कोड पुरवायला आणि कौतुकानें ‘ माझा क्लाऱ्या ’ ‘ माझा क्लाऱ्या ’ करायला नाहींत. या परिस्थितींत क्लारानें पुन्हां शाळेंत जायचें ठरवलें आणि उत्तर ऑक्सफर्डमधल्या एका शाळेंत तिचें नांव दाखल करण्यांत

आलें. अद्यापही ती बुजरीच होती; परंतु मध्यंतरीच्या सुश्रुषा-कार्यामुळें आतां शाळेबद्दल तेवढासा धाक वाटत नव्हता. तिनें आपला अभ्यास चोख आणि क्रम वरचा ठेवला. बुद्धिमान् विद्यार्थिनी हा लौकिक निर्माण केला.

या शालेय जीवनाच्या काळांत क्लारानें एकदां तिच्याबद्दलचा एक उल्लेख नकळत ऐकला आणि तिच्या आयुष्याला त्यामुळें एक वेगळें वळण लागलें. तिला गालगुंड झालें होतें आणि ती घरींच होती. घरीं एक पाहुणा आला होता. त्याचें नांव मिस्टर फॉवलर. फ्रेनॉलॉजींतला श्रेष्ठ तज्ज्ञ म्हणून या पाहुण्याची ख्याति होती. फ्रेनॉलॉजी म्हणजे कवटीच्या आकाराचें शास्त्र. कवटीवरच्या उंचसखल भागांवर माणसाचा स्वभाव, त्याचें कर्तृत्व आणि त्याची कुवत सांगता येते असा या शास्त्रांतल्या तज्ज्ञांचा सिद्धांत. कवटीचे हे उंचसखल भाग मेंदूच्या विशिष्ट ठिकाणच्या विकासामुळें निर्माण होतात ही या शास्त्राची गुरुकिल्ली. परंतु मेंदू मऊ, गिलगिलीत, नाजुक असून कवटी विलक्षण टणक असते या दोन गोष्टींची दखल या शास्त्राचे पुरस्कर्ते घ्यायला तयार नव्हते. या शास्त्रांतले कांहीं आडाखे व्यवहारांत बरोबर ठरत होते हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे.

तर मिस्टर फॉवलर तसे मोठे सज्जन आणि सरळ मनाचे गृहस्थ होते. तळमळीचे कार्यकर्ते होते. व्याख्यानांचा एक दौरा आटोपून ते इंग्लंडहून आलेले होते, क्लाराच्या घरींच रहात होते.

बोलतां बोलतां क्लाराच्या वडिलांनीं या मिस्टर फॉवलरना म्हटलें "आमच्या मुलीबद्दल कांहीं सांगा कीं—क्लाराबद्दल." लगतच्याच खोलींत क्लारा एका कोचांत पडून हें ऐकत होती.

"सांगतों." मिस्टर फॉवलर म्हणाले. "ती अशीच बुजरी, हळवी रहाणार. कधींही ती आत्मविश्वासानें वागणार नाहीं, निदान स्वतःच्या बाबतींत तरी. ती नेहमींच कसल्या ना कसल्या वेदनेनें, यातनेनें तळमळत रहाणार. कुढत रहाणार. दुखावली जाणार. परंतु तिच्या स्वतःव्यतिरिक्त आणखी कोणासाठीं तिला कांहीं करावें लागूं द्या—निर्भयपणें ती तें करील. आत्मविश्वासानें—म्हणजे स्वतःला विसरून

—ती तें करील. जबाबदाऱ्या टाका तिच्यावर, जबाबदाऱ्या.” क्लारानें मास्तरीण व्हावें असेंही त्यांनीं सुचविलें.

ही बुजरी पोर मास्तरीण कशी होणार हें क्लाराच्या आईला समजेना; परंतु एकंदरीनें मिस्टर फॉवलरचा सल्ला तिला—आणि क्लारालाही—पटला. कांहींही खळखळ न करता सर्वांनीं मिस्टर फॅावलर यांचें म्हणणें मान्य केलें. क्लाराच्या मनांत हा सल्ला ऐकल्यावर, स्वीकारल्यावर फक्त एकच विचार आला. “मी मास्तरीण होणारच असेन तर चांगली मास्तरीण होईन.”

आणखी एक वर्ष क्लारानें शालेय शिक्षण चालू ठेवलें. त्यानंतर गांवांतल्या छोट्या शाळेंत शिकविण्यासाठीं परवानगी मागितली. तिची बहीण सॅली हिच्या सासरनजीकच ही छोटीशी, एका खोलीचीच, शाळा होती.

त्या काळीं शिक्षिका वा शिक्षक होण्यासाठीं वेगळ्या शिक्षण-क्रमाची वा पदवीची आवश्यकता नसे. स्थानिक चर्चचा एक अधिकारी, एक वकील आणि एक मॅजिस्ट्रेट यांच्या कमिटीपुढें एक परीक्षावजा मुलाखत द्यावी लागे, तेवढीच.

क्लारा या खेपेला बुजली नाहीं. तिनें आपण आहोंत त्यापेक्षां उंच आणि प्रौढ दिसण्याचा प्रयत्नही केला. डोक्यावर केसांना उंच वळण दिलें, झग्याचा घोळ आणि लांबी वाढवली, आणि आतां आपण आपल्या सतरा वर्षांच्या वयापेक्षां अधिक प्रौढ दिसतों अशा विश्वासानें ती स्थानिक समितीपुढें मुलाखतीसाठीं उपस्थित झाली.

मुलाखतींत ती उच्च श्रेणींत यशस्वी झाली. शाळेची उन्हाळी तिमाही सुरू होईपर्यंत तिला आतां कांहीं उद्योग नव्हता. रिकामपण होतें. आणि या अशा रिकाम्या मनांत पुन्हां कांहीं नवीन धास्ती, नवीन भीति, नवी चिंता निर्माण होणें कठीण नव्हतें. नव्या पेशांत आपण एवढ्या मुलांपुढें जाऊन कशा शिकवणार ही तर अगदीं सहज सुचणारी धास्ती होती. परंतु सुदैवानें डेविडनें या काळांत आपल्या लग्नाचा सोहळा योजिला.

वधु मेन भागांतली होती आणि लग्न तिच्या गांवींच व्हायचें हें नक्की होतें. डेविडबरोबर क्लारा मेनला गेली. तिथला तिचा काळ अत्यंत गर्दीचा, गडबडीचा आणि म्हणून मजेचा गेला. या काळांत साऱ्या धास्त्या, चिंता ती संपूर्णपणें विसरली होती.

ती घरीं परत येतांच हें विसरलेलें सारें तिच्या मनांत फिरून वावरूं लागलें. एक तर शाळेचा आरंभ हातातोंडाशीं आला होता, पूर्वतयारीला फारसा वेळ उरला नव्हता. पहिल्या दिवशीं वर्गापुढें काय सांगायचें तें तिनें तशा घाईतही मनाशीं पक्कें करण्याचा प्रयत्न केला. हें करीत असता मनांतल्या भीतीला सहस्र मुखें फुटलीं. सहस्र जबडे, सहस्र जिभा—

शाळेंत जाणें सोयीचें व्हावें म्हणून ती सॅलीच्या सासरींच रहाणार होती. तिथें ती रहायला गेली.

शाळेचा पहिला दिवस. मिस क्लारा एच. बार्टन या साडेसतरा वर्षें वयाच्या शिक्षिका भयानें फटफटीत झालेल्या अवस्थेंत शाळेच्या फाटकाशीं आल्या.

अंगण रितें होतें, सोपा रिता होता.

शाळेच्या दाराशीं त्या आल्या. त्यांनीं बंद दार लोटलें. तिथेंच उंबरठ्याशीं त्या गळून केविलवाण्या उभ्या राहिल्या.

चाळीस मुलांचे ऐंशी डोळे 'बाई' कडे रोखून, एकटक पहात होते. विलक्षण शांतता पसरली होती. मुलें बाईकडे पहात होतीं, बाई मुलांकडे पहात होत्या; परंतु मुलांना बाई दिसत होत्या आणि बाईना केवळ हिरवे निळे ठिपकेच दिसत होते.

या मुलांमुलींत वेगवेगळ्या वयाचीं, आकाराचीं मुलें होतीं. चार मुलें तर जवळ जवळ बाईच्याच वयाचीं दिसत होतीं. दांडगी, दणकट आणि कावेबाज. यामागच्या शिक्षकाला त्यांनीं सळो कीं पळो करून सोडलेलें होतें. त्याला शाळेबाहेर कोंडण्यालाहि कमी केलें नव्हतें. क्लाराकडे ते चौघे पहात होते—निबरपणें, आव्हानपर मुद्रांनीं.

कशाबशा 'बाई' प्लॅटफॉर्मपर्यंत तर गेल्या. मनाशीं घोकलेलें सारें

कुठें हरवून गेलें होतें-कांहींच आठवत नव्हतें, सुचत नव्हतें. सुदैवानें पुढ्यांतल्या डेस्कवर बायबल होतें. क्लारानें तें उचललें आणि कुठें तरी उघडलें. तें होतें पांचवें प्रकरण; मॅथ्यूबद्दलचें. क्लारा वाचूं लागली. वाचतां वाचतां मन निवळूं लागलें. आपल्या स्वच्छ, नितळ आणि लयबद्ध आवाजाचें, आपल्या वाणीचें तिचें तिलाच आश्चर्य वाटूं लागलें. तिला वाटूं लागलें कीं हें एकूण जमतें आहे, होतें आहे, पुढें चाललें आहे, व्यवस्थित चाललें आहे. आणि क्लारांतला आत्मविश्वास जागृत झाला. उसळून, उचंबळून आला.

वाचता वाचता ती म्हणत होती, "Blessed are the merciful for they shall obtain mercy—दयेनेंच दया मिळते." नकळत तिची नजर त्या चार मुलांवर गेली. ते चौघे लांब पाहूं लागले.

क्लारानें किंचित् थांबून दीर्घ श्वास घेतला. पुन्हां ती पुढें वाचूं लागली. आवाज आतां खणखणीत आणि सुस्पष्ट होता. अगदीं पांचवें प्रकरण अखेरपर्यंत तिनें तसें वाचलें. त्यानंतर, निर्वेधपणें ती शिकवण्याकडे वळली. तीं चार दांडगीं मुलें गरीबपणें बसून होतीं.

दुपारच्या सुट्टींत क्लारा खेळाच्या पटांगणांत गेली. चेंडूचा खेळ ऐन रंगांत होता. डेविडबरोबर हे खेळ खेळलेली क्लारा पहाता पहाता या खेळांत शिरली, स्वतः खेळूं लागली. तीं चार दांडगीं मुलें एकमेकांत हंसत होतीं; परंतु पुढल्या दहा एक मिनिटांतच त्यांचें हास्य लोपलें.

या नवीन बाई भलत्याच चांगल्या खेळूं लागल्या. त्या चेंडू मारत कसा अचूक आणि सणसणून. पळत कशा हरणासारख्या. कुठल्याही खेळांत बाई वाकबगार आहेत हें मुलांना यानंतर कळून चुकलें. तीं चार मुलें मधून मधून जिंकत; परंतु बाई मुद्दाम आपल्याला जिंकण्याची सवलत देताहेत हें त्यांचें त्यांना समजे. त्या दांडग्या पोरांच्या चेहऱ्यावरचा उर्मटपणा लोपला आणि त्या जागीं आला आदर; त्या जागीं आली कृतज्ञता.

एक आठवडाही उलटला नसेल तों हीं चार मुलें बाईंना कुठलीही मदत करण्यांत तत्पर राहूं लागलीं. निरोप पोंचविणें, फळा पुसणें, केर

काढणें, शेकोटीचीं लाकडें जमा करून आणणें, पुस्तकें नेणें आणणें, सारें तीं उमेदीनें करूं लागलीं. बाईंच्यासाठीं आपण कांहीं करतों आहोंत यांतच त्यांना अभिमान वाटूं लागला.

हें सारें अर्थातच गांवांत गुणगुणलें जाऊं लागलें, सर्वांनाच समजलें आणि शिस्तीबद्दल क्लाराची जिकडे तिकडे प्रसिद्धि झाली.

ती चिडली.

"शिस्त ! कुणी लावली शिस्त ! कुणाला !" ती विचारी. "मी कुणालाही शिस्त लावलेली नाहीं. मी कुणाशींही कडक वागलेली नाहीं."

सत्तर वर्षांनंतर क्लाराच्या या विद्यार्थ्यांतल्या एका मुलानें आठवण नोंदवून ठेवली आहे, "बाई हंसत तेव्हां चमकणारे त्यांचे मोत्यांसारखे दांत मला अद्याप स्पष्ट दिसतात."

क्लारानें आपल्या या विद्यार्थ्यांबद्दल नमूद करून ठेवलें आहे, "माझ्याशीं तीं एकनिष्ठ होतीं. पुढें देशाशींही त्यांनीं ज्वलंत निष्ठा ठेवली. त्यानंतरच्या अनेक रणांवर या मुलांचें रक्त सांडलें, वाहिलें आहे. मला या मुलांचा अभिमान वाटतो."

● ● ●



# ५

हळू हळू क्लाराचा आत्मविश्वास वाढूं लागला. शिक्षिका म्हणूनही तिला मानलें जाऊं लागलें. 'या बाईंची शिस्त कडक' असा लौकिक उगीचच होताच. जवळपासच्या कोठल्याही शाळेंत एखाद्या शिक्षकाला आपलें काम जमत नसलें कीं क्लाराला तात्पुरतें तिथें नेण्यांत येई. क्लाराला मुलें कधींच त्रास देत नसत; त्यामुळें आणखी कोणाला तीं कां त्रास देतात हें तिला कळूं शकत नसे. शिक्षकांतच कांहीं उणें असावें असें ती म्हणे.

दरम्यान स्टीफन आणि डेविडनीं एक फॅक्टरी विकत घेतली होती. फॅक्टरींतल्या कामगारांच्या मुलांना शिक्षणाची सोय उपलब्ध नाहीं हें कळतांच क्लारानें त्यांच्या शिक्षणासाठीं एक शाळा सुरू केली आणि अनेक वर्षेंपर्यंत ती या शाळेंत शिकवीत असे.

तिचा बुजरेपणा संपूर्णपणें केव्हांच गेला नाहीं. कांहीं काळ तो नाहीं असें वाटे आणि पुन्हां त्याचें अस्तित्व जाणवूं लागे. या काळांत तो भासत नव्हता. ती खूप काम करीत होती, म्हणूनच लोकप्रिय झाली होती आणि सुखीही होती. आपल्या वयाच्या तरुण मुलांमुलींत ती सहज समरसून जाई.

त्या काळच्या निकषांनीं क्लारा मुळींच देखणी ठरली नसती, तरी पण आजच्या दृष्टीनें ती देखणीच होती. तिचा केशभार विपुल, दाट आणि रेशमी होता. तिचे डोळे पिंगट आणि टपोरे होते. तिचें नाक धारदार आणि ठळक होतें. आणि तिची जिवणी रुंद-हळव्या स्वभावाची दर्शक-होती. त्या काळांत ती देखणी मानली गेली नसली तरी ऑक्सफर्ड आणि त्या आसपासच्या टापूंत ती शिक्षिकेचें काम करीत असतांना अनेक तरुणांनीं तिच्याशीं विवाहाची मनीषा बाळगली होती. यावरून तिच्यांतल्या आकर्षकतेची कल्पना सहज करतां येते.

यांतल्या एका तरुणानें तर क्लाराच्या नकारानंतर इरेला पेटून कॅलिफोर्नियाकडे धांव ठोकली आणि तेथल्या सोन्यानें गडगंज श्रीमंत होऊन तो क्लाराकडे परत प्रियाराधनासाठीं आला. यावेळीं आपल्याला होकार मिळणार याविषयीं त्याची खात्री होती.

परंतु मिळाला पुन्हां एकवार नकार. क्लारा त्याच्या श्रीमंतीला भुलली नाहीं. त्याच्या निष्ठेनें, धडपडीनें आणि आशाळभूतपणानें तिच्या अंतःकरणांत खळबळ उडाली. परंतु तिनें दिला नकारच. इतःपरही कच न खातां त्या तरुणानें जास्तच इरेला पडून क्लाराच्या खातीं बँकेंत १० सहस्र डॉलर्स भरले. क्लारा त्या रकमेला स्पर्श करीना. तोही ते परत घेईना. ते पैसे तसेच क्लाराच्या खात्यांत राहिले. व्याज वाढत राहिलें.

क्लारांतल्या वा कुठल्याही स्त्रींतल्या या आकर्षणाचें वर्णन करणें अवघड आहे. एका जलप्रवासांत क्लाराबरोबर एकाच बोटीनें प्रवास करीत असलेल्या एका स्नेह्यानें या प्रकरणीं लिहून ठेवलें आहे तें असें, ' या बाईंत कसलें तरी विलक्षण आकर्षण होतें. तें बहुधा तिच्या डोळ्यांत होतें, असें मला वाटतें. माझ्या हयातींत मी असले डोळे पाहिले नाहींत——इतके स्नेहल, इतके दयार्द्र, इतके क्षमाशील; आणि तरीही तल्लख. हे डोळे आपल्याकडे पाहूं लागले कीं वाटे, ' कळलें! आपलें सारें त्यांना कळलें! आणि कळलें तें बरेंही झालें.' डोळ्यांव्यतिरिक्त पहावयाचें तर क्लारा बार्टनची वाणी मोठी हजरजबाबी, चतुर. जिवणीला हास्याचें खूळ. तरी पण तिचें खरें आकर्षण, ती समोर असल्यावर आपल्याला अगदीं मोकळें,

स्वस्थ, सुरक्षित आणि हलकें वाटे त्यांतच असलें पाहिजे. हें वाटणें खरोखर संस्मरणीय असे. क्लारा बार्टनला लाल रंग एका विशिष्ट छटेंत फार आवडत असावा; कारण बहुधा तिचा पोषाख लाल रंगाच्या या छटेंतला असे. तिचे केंस, माझ्या आठवणीप्रमाणें, पिंगट होते. ते पिकलेले नव्हते. मी सांगतों आहे ती क्लारा बार्टन सत्तर वर्षांच्या उमरीची; परंतु तिचा एकही केंस पिकलेला मला दिसला नव्हता. तिची चण बारीक होती—परंतु त्याचें काय ? तिचा नुसता एक दृष्टिक्षेप—एक स्मित—खलास ! अडकलांत तुम्ही जाळयांत ! झालांत कैद ! ”

क्लाराच्या या नजरेचे परिणाम प्रत्यक्षांत वेगवेगळया लोकांवर वेग-वेगळया प्रकारचे होत. स्वार्थी असत, कावेबाज असत, हलकट असत त्यांना क्लाराची ही नजर सहन होत नसे. अशा माणसांना क्लारापासून लांब जावेंसें वाटे. तिच्या या नजरेचा, तिचाच, त्यांना तिरस्कार वाटे. पुढील काळांत क्लारानें मित्रांप्रमाणें शत्रूही निर्माण केले—वाढत्या कीर्तिबरोबर तिचे शत्रू वाढत गेले.

१८५० च्या सुमाराला, वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी तिला वाटूं लागलें, जास्त शिकायला मिळालें तर जास्त चांगल्या तऱ्हेनें शिकवतांही येईल. तिनें कॉलेजांत जायचें ठरवलें. विशिष्ट अभ्यास-क्रमांचे वेगवेगळे कोर्सेस घेतले. क्लिंटन, न्यूयॉर्क येथल्या हॅमिल्टन कॉलेजच्या लिबरल इन्स्टिटयूटमध्यें ती दाखल झाली.

त्या काळांत प्रवासाच्या आजच्या सोयी नव्हत्या. प्रवासाला आजचा वेग नव्हता. क्लिंटनला जायचें तर ऑक्सफर्डपासून तब्बल तीन दिवसांची मजल होती. क्लाराला हें बरें वाटलें–कारण या ना त्या कारणानें परत गांवीं यावें लागण्याचा संभव यामुळें कमी होणार होता.

क्लाराच्या या नवीन बेतामुळें तिच्या साऱ्याच माणसांना आश्चर्य वाटलें, दुःख वाटलें. विशेष करून तिच्या भावांना तिचा हा बेत अतिशय बोंचला. कारण त्यांच्या कारखान्याच्या कामीं एकूण धोरण ठरवितांना क्लाराचा त्यांना फार उपयोग होत आला होता. अर्थात्

क्लाराच्या बेताआड कोणीही येणें शक्य नव्हतें. सर्वांनीं परवानगी दिली. गैरसोय पोटांतच ठेवली.

स्टीफन आणि डेविडनीं तिला स्टेशनापर्यंत सोबत केली. गाडी नजरेपुढून संपूर्ण निपटली जाईपर्यंत ते त्यांच्या क्लाराला हात हलवून निरोप आणि सदिच्छा देत होते. या खेपेला क्लारा खरोखरी आपल्या एकटीच्याच धमकेवर उघड्या जगांत शिरली होती. पुढें काय घडणार होतें हें कोणालाच सांगता आलें नसतें.

कॉलेजच्या शिक्षणानें क्लाराला हवें होतें तें मिळालें. शिवाय एक नवीन जिवलग मैत्रिण मिळाली. बोर्डन टाउन, न्यू जर्सीची मेरी नॉर्टन.

आणि त्याच सालीं क्लाराची आई निवर्तली. तिच्या अखेरच्या दर्शनाचेंही भाग्य क्लाराला लाभलें नाहीं. प्रवास मोठा होता-घरचा निरोप आला होता कीं, येण्याच्या भानगडींत पडूं नकोस, तिथेंच रहा.

क्लारा दुःखानें सुन्न झाली. प्रथमच तिला मृत्यूंतली अपरिहार्यता जाणवली होती. आईशिवाय जग, जीवन, घर, ती समजूंच शकत नव्हती. आई गेली आणि जग नेहमींसारखें चाललें आहे, चालणार आहे हें तिला पटूंच शकत नव्हतें. परंतु ती तिच्या आईची मुलगी होती. तिची आई असती तर म्हणाली असती, “कुढत नको बसूंस. काम पुढें चालू कर.” क्लारानें शोक झाडला. औदासीन्य टाकलें. आणि कांहींशा विमनस्कपणेंच ती आपल्या कामाला पुन्हा लागली. धीर द्यायला, उत्तेजन द्यायला मैत्रिण मेरी नॉर्टन होती.

कॉलेजांत शिकविणारे दोन तरुण प्राध्यापक या काळांत क्लाराच्या प्रेमांत पडले. त्यांना कसें आणि काय सांगावें हें क्लाराला समजेना. त्यांतल्या एकाबरोबर तर तिच्या नकळत ती बरीच वाहून गेली. कांहीं वर्षें दोघांचा जिव्हाळ्याचा स्नेह होता. अखेर मात्र क्लारानें याही प्रियकराला नकार दिला—स्पष्ट, सरळ आणि विचारपूर्वक.

दुसऱ्या एकाद्या मुलीला, आपल्यावर दोन तरुण एका वेळीं प्रेम करताहेत, यांत कांहींच कष्टदायक वा असह्य वाटलें नसतें. परंतु क्लारा

हळवी, समंजस, भावनावश होती. कोणालाही दुखावणें तिला मरण वाटे. शिवाय लग्नाचा मार्गच आपला नव्हे हें ठरल्यानंतर हीं नवनवीन प्रियाराधनें तिला कष्टदायक, असह्य वाटलीं असलीं तर नवल नव्हे.

अभ्यासक्रम संपला. कॉलेजचा ऋणानुबंध संपला, ती घरीं परत आली. जड पावलांनीं, जड मनानें. आई नव्हती. घर बंद होतें. वडील स्टीफन-कडे रहात होते. घरीं कशाला रहायचें, कुणासाठीं रहायचें ? क्लारा शक्य तितक्या लवकर तिथून बोर्डेन टाउनला मेरी नॉर्टनकडे गेली.

कांहीं दिवस मेरीकडे रहावें एवढाच जातांना विचार होता. आणि गेल्यावर दहा वर्षें ती तिथेंच राहिली. बोर्डेन टाउनमधल्या शाळांतून अध्यापन करीत. न्यू जर्सीमधलें पहिलें पब्लिक स्कूल–मोफत शिक्षणाची खुली शाळा–क्लारामुळें इथें उघडली गेली.

हें घडलें तें सहजपणेंच.

क्लारा नेहमींसारखी फिरायला बाहेर पडली होती. गांवांतून जात होती. तिला आढळलें, शाळेंत जातात त्याहून अधिक मुलें इथें अशिक्षित, निरक्षर, मागासलेलीं रहातात. तिनें चौकशी चालवली, हें असें कां ? आणि समजलें तें असें कीं या बहुसंख्य मुलांच्या आईवडिलांकडे खाजगी शाळेंत लागणाऱ्या फीला पैसे नाहींत. मूल शिकलें पाहिजे असें वाटलें तरी त्याला शिकवण्याची आर्थिक कुवत नाहीं.

आणि मोफत शिक्षण देण्याची सोय गांवांत नाहीं. कायद्याच्या पुस्तकांत मोफत शिक्षणाची तरतूद पण प्रत्यक्षांत शिक्षणाला शेकडों मुलें महाग! त्यामुळें दुर्गुणांना, व्यसनांना, गुंडगिरीला मोकळें रान! क्लारानें प्रत्यक्षच या अशा मुलांत फिरून, त्यांच्याशीं बोलून या परिस्थितीची कल्पना करून घेतली.

मुलांनीं तिला आपली घरची परिस्थिति, आपला कार्यक्रम, आपल्या महत्त्वाकांक्षा आणि त्या सफल होण्याची आशा नाहीं याबद्दलचा तीव्र विषाद; सारें सांगितलें. "बरं का बाई," तीं म्हणत, "मोफत शाळा काढली कुणी तर आम्ही शिकूं तिथ येऊन. पण कोण करणार आमच्या-साठीं एवढं ?"

एकाच दिवशीं पुनःपुन्हां हें ऐकल्यावर क्लारांतली ईर्षा स्फुरली. कणव गोठून तिचा खडतर प्रयत्नवाद बनला. क्लारा गेली स्कूल्स कमिटीच्या अध्यक्षाकडे. हे कुणी मिस्टर स्युडॅम म्हणून गृहस्थ होते. क्लारा म्हणाली, " गांवांतल्या गरीबांच्या अशिक्षित, रिकाम्या मुलां-साठीं शाळा काढणार आहे मी. मोफत शिक्षण देणारी शाळा. "

अध्यक्ष गडबडले. भयंकर चिंताक्रांत आणि अस्वस्थ झाले. ते म्हणाले, " कल्पना नामी आहे हो, पण जमणार कशी ? हीं खालच्या लोकांचीं पोरं माहीत नाहींत तुम्हांला. सारीं वाह्यात, वांया गेलेलीं. तीं शाळेला कसलीं येतात ? तीं कसलीं शिकतात ? आणि त्यांतून तुम्ही बाई. बरं, हें सारं सोडलं तरी त्या मुलांचे आईवडील कबूल व्हायला हवेत ना त्यांना मोफत शाळेंत पाठवायला ! समजा, तेही तयार झाले; तरी गांवांत उगीच बभ्रा व्हायचा—एक कुलीन, घरंदाज बाई या माणसांशीं संबंध ठेवते म्हणून ! नांव बद्दू होईल तुमचं ! आणि समजा, तेंही चालत असेल तुम्हांला. पण तुमचा पगार ? तो कोण देणार ? सोडा—ही कल्पनाच सोडा. नाहीं जमणार ती. "

क्लारानें हें सारें ऐकून घेतलें. ती मध्यें कांहीं बोलली नाहीं. ती केवळ अध्यक्षमहाराजांकडे एकटक पहात होती. बोलून संपल्यावर अध्यक्षांनीं कपाळाचा घाम निपटला. ते गप्प राहिले. मग थोडा वेळ तसाच जाऊं देऊन क्लारा म्हणाली, " आभारी आहे तुमच्या सल्ल्याबद्दल. आतां मी थोडी बोलूं ? "

" हो हो—बोला ना. अवश्य. " अध्यक्ष हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाले.

क्लारानें अत्यंत मुद्देसूदपणें त्यांचे सारे आक्षेप खोडून काढले. ती म्हणाली, " मॅसाच्युसेट्समध्यें मी बरींच वर्षं मोफत शिक्षणाच्या शाळांतून शिकवलं आहे. तिथं साऱ्या प्रकारचीं मुलं मला भेटलीं आणि मला कुणी म्हणण्यासारखा त्रास दिला नाहीं वा माझा अपमान कधीं केला नाहीं. मुलांचा मला अनुभव असल्यानें इथलीं हीं गरीबांचीं मुलंही मला तशीं जड जायचीं नाहींत. निदान मला तरी तशी धास्ती अणुमात्र

नाहीं. नांव बद्‍ होण्याचं आणि बभ्रा होण्याचं म्हणतां तेंही कांहीं अंशी खरं धरलं तरी चांगलं काम करणाऱ्यानं त्याची पर्वा कां करावी ? होऊं दे माझ्यावर टीका. माझ्याबद्दल गांवाचा वाईट ग्रह होणार नाहीं एवढी काळजी मी घेईन. मला पगार कुणी द्यायचा असा प्रश्न तुमच्यापुढें आहे. परंतु मला पगार नको मी मोफत-एका पैचीही अपेक्षा न करता-या गरीब कुटुंबांतल्या मुलांना शिकवीन."

अध्यक्षमहाराज गप्पच होते. यावर त्यांना काय सुचणार ? क्लारा पुढें बोलूं लागली.

ती म्हणाली, "माझ्या या नियोजित शाळेला सरकारची आणि सरकारचे प्रतिनिधि म्हणून तुमच्या स्कूल बोर्डाची मदत हवी. तुम्ही या शाळेसाठीं इमारत दिली पाहिजे, सामानसुमान दिलं पाहिजे. आणि गांवांत साऱ्यांना या नवीन शाळेबद्दल कळेल अशी व्यवस्था केली पाहिजे. स्कूलबोर्डाची मोफत शाळा म्हणूनच ही शाळा ओळखली जावी म्हणजे पुढल्या साऱ्या अडचणींतून मार्ग सुकर होईल."

"या शाळेंतलं प्रत्यक्ष काम आणि तिचं यश तुम्ही माझ्यावर सोंपवा." तिनें सांगितलें. "मला यांत कशाचीही अपेक्षा नाहीं. मला फक्त, सरकारच्या पाठबळावर, अज्ञान आणि निरक्षरतेविरुद्ध लढाई करायची आहे. कदाचित् इथें मोफत शिक्षणाचा हा प्रयत्न रुजणार नाहीं, अयशस्वी होईल हेंही मी वाटल्यास जमेला धरते. परंतु प्रयत्न तर केला जाऊं दे. कळूं दे तरी हें जमत नाहीं हें. इमारत तर तुमच्याकडे आहेच. तीच डागडुजी करून शाळेला द्या."

बोर्डाच्या अध्यक्षमहाराजांच्या मनांतल्या साऱ्या शंकाकुशंकांना यांत समर्पक उत्तरें होतीं. ते निरुत्तर झाले. क्लाराकडे आदरानें पाहूं लागले. म्हणाले, "बोर्डापुढें ठेवतों सारं लागलींच."

क्लाराची शाळा मूर्त स्वरूपांत आली.

प्रथम सहा विद्यार्थी होते. वर्षअखेरीस सहाशें होते. शाळेसाठीं मग नवीन, मोठी इमारत बांधण्यांत आली. साऱ्या गांवाचें अभिमानाचें स्थान झाली होती ती शाळा—आणि इथेंच बिघडलें.

• • •



# ६

ही शाळा क्लाराच्या प्रयत्नांनीं मूर्त स्वरूपांत आली होती. क्लाराच्या परिश्रमांनीं वाढली होती. क्लाराच्या कुशलतेमुळें नांवारूपाला चढली होती. नव्या इमारतींत शाळेची नवी प्रतिष्ठापना होतांच मुलांना वाटलें, आतां प्रिन्सिपॉल क्लारा बार्टन बाईच !

क्लारानें यावर आधीं कांहीं विशेष विचार केला असेल कीं नाहीं तें सांगता येत नाहीं. तिला हुद्द्यांचा आणि मानसन्मानाचा कंटाळा होता. कधींच तिला त्यांची हांव वाटली नाहीं. परंतु शाळेबद्दल तिला आत्मीयता, अगदीं वात्सल्य होतें. आपलें नांवच प्रिन्सिपॉलपदासाठीं घेतलें जाणार याबद्दल ती निश्चित असावी.

आणि नेमका या सुमाराला तिच्याविषयीं—बोर्डाच्या अध्यक्षांनीं ध्वनित करून ठेवलेला—ग्रह गांवभर मूळ धरूं लागला, वाढूं लागला. बाईला काय जमतें ? बाई ती बाईच. जबाबदारी पेलायची तर त्याला हवा पुरुष. क्लाराबद्दल कोणीच अनादर व्यक्त करीत नव्हतें; परंतु नव्या,

मोठ्या शाळेची जबाबदारी बाईवर नको हें मत प्रभावी होतें. बार्टन बाईना ती पेलणार नाहीं म्हणून सारे म्हणत.

परंतु क्लारानेंच तर शाळा या अवस्थेपर्यंत अत्यंत जबाबदारीनें आणली होती. गांवकऱ्यांना याचें काय ? कांहीं सनातनी पुरुषांनीं ओरडा सुरू केला. मोहीम उघडली. त्यांत इतर घाबरट लोक आतां सामील झाले. ज्या अर्थी एवढे लोक एका आवाजांत बोलतात त्याअर्थी त्यांचें म्हणणें खरें असलें पाहिजे असा निष्कर्ष उरलेल्यांनीं काढला आणि या मोहिमेला पाठिंबा दिला.

निःस्वार्थपणें, स्वतःला विसरून एकाद्या गोष्टीसाठीं झगडणाऱ्या क्लारानें स्वतःविरुद्धच्या या प्रचाराबाबत मुळींच कांहीं केलें नाहीं. ती स्वस्थ राहिली. गांव जिंकलें. प्रिन्सिपॉलच्या जागेवर एक पुरुष आणून नेमण्यांत आला. क्लाराला हें झोंबलें. परंतु रीतीसारखें तिनें या नव्या प्रिन्सिपॉलचें स्वागत केलें.

हा नवा प्रिन्सिपॉल मनाचा खंबीर, उदार, न्यायी असता तर इतःपरही सारें सुरळीत घडतें. परंतु हा होता मनाचा उथळ, दुबळा, उलाढाल्या.

आल्याआल्याच त्याला कळलें कीं क्लारावर इथें अन्याय झाला असला तरी गांव तिला मानतें. तिच्याविषयीं कृतज्ञता बाळगतें. क्लाराचें कर्तृत्वही त्याला उमजलें आणि त्याला समजून चुकलें कीं या बाईचा कसाही पण कांहीं बंदोबस्त केलाच पाहिजे.

प्रथम तो सावधगिरी ठेवून होता, जपून पावलें टाकीत होता. क्लाराशीं तुटकपणें, थोडें चढेलपणें आणि कुत्सितपणें वागणें त्यानें ठेवलें होतें, तेवढेंच. त्यानंतर, ती हें सारें सहन करते असें पाहून त्यानें तिच्या कामांत चुका काढायला आरंभ केला. तिनें केलेलें कांहींच त्याला पटेनासें झालें. एकाद्या विद्यार्थ्याशीं ती कडक वागते असें दिसलें कीं तो त्या विद्यार्थ्याची बाजू घेई. तिच्या शिकवण्याच्या पद्धतीवर तो उघड टीका करूं लागला. प्रथम शाळेपुरतेंच हें होतें, मग गांवभर झालें,

संधि सांपडली कीं तो क्लाराला दोष देई, तिच्यावर आरोप लादी, तिला नालायक ठरविण्याची शिकस्त करी. हें सारें त्याला कठीण जाई कारण क्लाराची सहसा चूक नसे. तिची शिकवण्याची पद्धत परिणामकारक होती. आपलें काम ती चोख करी. क्लाराला भरपूर मन-स्ताप मात्र तो देऊं शकत होता.

तिनें राजीनामा दिला असता—यांतून तात्काळ सुटकेची एवढीच आशा होती. परंतु हें तिला करायचें नव्हतें. तिला तिच्या शाळेंतून असें भ्याडासारखें बाहेर पडायचें नव्हतें. आणि तो नवा इसम तिला बाहेर काढूं शकत नव्हता. त्याच्या हातीं तें नव्हतें. परिस्थिती जास्त जास्तच चिघळूं लागली. क्लाराची सहनशक्ति सीमेपर्यंत ताणली गेली. तिची तब्येत खालावली. ती कृश, फिक्कट, वयस्क दिसूं लागली. स्टीफनला या सुमाराला लिहिलेल्या पत्रांत तिनें लिहिलें होतें, "मला अगदीं बरें नाहीं."

या त्रासांत तिचा आवाज गेला. आणि पुन्हां तो पूर्ववत् झाला नाहीं. गळ्यांतून कांहीं उमटत नसेल तर शिकवायचें तरी कसें? क्लारानें राजिनामा दिला. अत्यंत हताश, निराश मनःस्थितींत, थकलें शरीर ओढीत ती गांवीं पोंचली. कोरड्या हवेंत आवाज सुधारेल या कल्पनेंत गांवाहून ती वॉशिंग्टनला गेली.

बोर्डेन टाउनमधली तिची शाळा हें आज तिचें स्मारक बनलें आहे.





## ७

आतां क्लाराचें वय बत्तिशीच्या घरांत आल होतें. शिक्षिकेचा पेशा तात्पुरता सुटला असला तरी तो कायमचा सोडावा हें मनांतही येत नव्हतें. विश्रांति हवी होती, आवाज सुटण्यासाठीं कोरडी हवा हवी होती आणि राष्ट्राच्या राजकीय उलाढालींतलें कांहीं जाणून घ्यावें अशी एक इच्छा मनांत कुठें तरी वावरत होती.

१८५४ मध्यें क्लारा वॉशिंग्टनमध्यें आली. तेव्हांचें वॉशिंग्टन शहर कसें होतें ? अस्वच्छ आणि अस्ताव्यस्त होतें. ५० हजाराच्या आसपास त्यांतली वस्ती होती: नुक्तीच या शहराच्या पुनर्रचनेची आंखणी झालेली होती परंतु प्रत्यक्ष काम सुरूं झालेलें नव्हतें. सडका आणि बोळ धुळीनें किंवा चिखलानें भरलेले असत. रस्त्यांवर फारसे दिवे नव्हते. पाण्याची सोय नैसर्गिक होती. विहिरी आणि झऱ्यांतलेंच पाणी वापराला, प्यायला आणण्यांत येई. चौकांतून गुडघाभर गवत वाढलेलें दिसे.

एवढें सगळें असलें तरी राष्ट्राची ती राजधानी होती. या कल्पनेनेंच क्लाराला या शहराविषयीं आदर वाटूं लागला. तिथल्या कोरड्या

हवेंत आवाज सुटेल ही आशाही बळावली. तिनें एक खोली भाड्यानें घेतली आणि तिथें राहून ती अमेरिकेच्या विधिमंडळाच्या बैठकींना हजर राहूं लागली. राजकीय ज्ञान मिळवूं लागली.

आवाज सुधारूं लागला. गेलेली ताकद पुन्हा भरूं लागली. येथवर हें सारें सुरळीत चाललें. आतां बरें वाटूं लागतांच क्लाराला अस्वस्थ वाटूं लागलें. काम पाहिजेसें वाटूं लागलें. इतक्यांत शिक्षिकेच्या नोकरींत पडण्यासारखी परिस्थिति नसली तरी दुसरें तरी कांहीं काम तिला हवेंसें वाटूं लागलें.

तिच्या गांवाचा कॉंग्रेसमधला प्रतिनिधि आणि तिच्या वडिलांचा स्नेही कर्नल अलेक्झँडर ड विट याच्याकडे, त्या निमित्तानें तिला जावें लागलें. अगदीं बालपणापासून ती त्याला ओळखत होती. आतां ती त्याला म्हणाली, " माझ्याजोगतें कांहीं काम सुचवा. माझा वेळ जात नाहीं. माझ्या आवाजावर ताण पडणार नाहीं असेंच तें काम असलें पाहिजे. "

पेटंट ऑफिसचा प्रमुख जज्ज चार्ल्स मेसन याच्याशीं कर्नल ड विटनें तिची गांठ घालून दिली. जज्ज मेसनला क्लारा पसंत पडली. आणि त्यानें तिला आपल्या कचेरींत कारकून म्हणून ठेवून घेतलें.

अमेरिकेच्या सरकारी कचेरींत, पुरुषांच्या बरोबरीनें, पुरुषाच्याच पगारावर, पुरुषाचें काम एक स्त्री करूं लागली ती ही प्रथमच. त्यामुळें क्लाराविरुद्ध आणि जज्ज मेसनविरुद्ध पुरुषी टीकेचें मोहोळ उठलें. क्लारा आपल्या टेबलाकडे जाऊं लागली कीं सारे पुरुष कारकून वाटेंत उभे रहात आणि चेष्टा टवाळी करून हंसत. तिच्या तोंडावर धुराचे लोट सोडीत, तिच्या शक्य तितक्या आसपास तंबाकूच्या पिचकाऱ्या टाकत. एकाची मजल तर तिच्याविरुद्ध एक घाणेरडी अफवा उठवण्यापर्यंत गेली. तो कारकून थेट जज्ज मेसनपुढें गेला. " जज्ज, " तो म्हणाला, " ही बाई भयंकर आहे. " त्याचें सर्व म्हणणें शांतपणें ऐकून घेऊन जज्ज मेसन म्हणाला, " म्हणतां तें सप्रमाण सिद्ध करा. तसं सिद्ध केलंत तर काढतों

तिला कामावरून. परंतु तसं सिद्ध करण्यांत तुम्हांला यश आलं नाहीं तर तुमची हकालपट्टी होईल ! ”

आणि खरोखरीच त्या कारकुनाची अखेर त्या कचेरींतून हकालपट्टी झाली.

क्लारानें हें सारें धैर्यानें सोसलें. इकडे दुर्लक्ष केलें. हळू हळू कचेरींतल्या कारकुनांना तिला विरोध करीत रहाण्याचा कंटाळा आला आणि त्यांनीं क्लाराचा नाद सोडला.

वॉशिंग्टनमध्यें ती असतांना पहिल्याच वर्षी तिच्या भावानें-- स्टीफननें—उत्तर कॅरोलिनांत २००० एकर जमीन घेतली आणि व्यवस्थेसाठीं तो तिकडे गेला. आतांपर्यंत त्याच्या आधारानें रहाणाऱ्या क्लाराची गत एकटें एकटें पडल्यासारखी झाली—तिचा जन्मापासूनचा सांगाती लांब गेला. डेविडवर तिचा जीव परंतु विश्वास स्टीफनवर. साऱ्या गुजगोष्टी ती त्याला ऐकवी. त्याचा सल्ला विचारी. आणि आतां स्टीफन लांब गेला. उत्तर कॅरोलिनांत.

वॉशिंग्टनमध्यें, पुढल्या वर्षी तर तिला स्टीफनची उणीव चांगलीच जाणवली. अंतर्गत व्यवहार खात्याचे चिटणीस रॉबर्ट मॅक्‌क्लेलॅंड यांच्याशीं तिचें बिनसलें होतें. क्लाराचा यांत कांहींच दोष नव्हता; परंतु जज्ज मेसननें तिची नेमणूक केली होती आणि म्हणून मॅक्‌क्लेलॅंडचा तिच्यावर राग होता. मॅक्‌क्लेलॅंडचें आणि मेसनचें अतिशय वांकडें. क्लाराची नोकरी या प्रकरणांत जायचीच; परंतु कर्नल ड विटनें मध्यस्थी करून हें टाळलें. नोकरी टिकली.

क्लारा चिकाटीनें नोकरीला चिकटून राहिली आणि मग मॅक्‌क्लेलॅंडनेंच तिचा नाद सोडला.

शेवटीं जज्ज मेसननें त्यागपत्र दिलें. इकडे जेम्स बुचानन अमेरिकेच्या अध्यक्षपदीं निवडून आला आणि अंतर्गत खात्याच्या चिटणीसपदीं मॅक्‌क्लेलॅंडच्या जागीं दुसरा माणूस आला. आणखी एक वर्ष क्लारा या नोकरींत राहिली. त्यानंतर सरकारनें खर्च-कपात योजिली आणि किती तरी सरकारी नोकर बेकार झाले. यांत क्लारा होती.

फारसा विषाद न मानतां ती घरीं गेली.

वॉशिंग्टनमधल्या या काळाचा तिला किती उपयोग झाला होता हें पुढें दिसावयाचें होतें.

अमेरिकन विधिमंडळाच्या अनेक सदस्यांशीं आणि त्यांच्या सहधर्मचारिणींशीं तिच्या या काळांत ओळखी झाल्या होत्या आणि तिच्या गुणांची जाणीव त्यांना झाली होती. विधिमंडळाच्या बैठकींना उपस्थित राहून खर्च केलेला वेळही अगदींच वांया गेला नव्हता. राजकीय दृष्टया क्लारा आतां सुजाण झाली होती. अमेरिकेंत स्त्रियांत राजकीय जाणीव त्या काळांत जवळ जवळ नसेच. विधिमंडळाच्या या बैठकी ऐकतांना नकळत क्लारानें एक अभ्यास केला होता—वक्तृत्वाचा. परिणामकारक वक्तृत्वाच्या साऱ्या गुरुकिल्ल्या तिला समजूं लागल्या होत्या.

घरीं परतल्यावर तिला आतां बरें वाटलें. जवळ जवळ तीन वर्षें मग ती वडिलांजवळ होती. वडिलांची उमर आतां झाली होती ८३ वर्षांची. त्यांची तब्येत—वयोमानानुसार–आतां बरी नसे. शिवाय क्लाराला हा विश्रांतीचा दीर्घ काळही हवासा वाटला. पुढें कित्येक वर्षपर्यंत पुन्हा असली विश्रांति तिला मिळावयाची नव्हती.

घरीं तिचें राजकीय ज्ञानार्जन चालूच होतें. अमेरिकेचा दक्षिण भाग आणि उत्तर भाग, यांतल्या वाढत्या वितुष्टांनीं तिचें मन व्यथित होई. दोन्ही भाग यादवीकडे झुकत होते. यादवी, युद्ध, रक्तपात, विध्वंस अटळ होता. क्लाराला स्वतःला ही यादवी, हें युद्ध, रक्तपात होतील असें मनोमन वाटत नव्हतें. तिला वाटे, आपापसांत एवढें होणार नाहीं. परंतु तरीही चिंता होतीच.

वॉशिंग्टनमध्यें पेटंट ऑफिसांत तिच्या पश्चात् आतां तिची किंमत सर्वांना पटली होती. एके दिवशीं अचानक पेटंट ऑफिसकडून बोलावणें आलें.

क्लाराला बरें वाटलें. आपल्या कामाची बूज राहिली याचें समाधान वाटलें. आपली कोणाला तरी गरज भासली याचें सुख झालें. परंतु

जावें कीं न जावें या संभ्रमांत ती पडली. वॉशिंग्टनमधलें वातावरण तेवढेंसें स्वास्थ्याचें उरलें नव्हतें.

तिच्या वडिलांनीं तिला सल्ला दिला, "जा." वडिलांचा सल्ला शिरोधार्य मानून क्लारा निघाली.

१८६० सध्यें क्लारा पेटंट ऑफिसांतल्या कामावर पुन्हा रुजूं झाली. तिला श्वास टाकायलाही उसंत न मिळतां एकदम यादवी भडकली, पसरली, युद्धाचा डोंब उसळला.

अब्राहम लिंकन अमेरिकेचा राष्ट्रपति होता.





# ८

अमेरिकेच्या दक्षिण आणि उत्तर भागांत यादवी जुंपली. या यादवीच्या बुडाशीं काय हातें ? या यादवीचें मूळ कारण अस कीं अमेरिकेच्या या दोन भागांतल्या जीवनांत, आणि त्यामुळें जीवनविषयक दृष्टिकोनांत मोठा फरक राहून गेला होता. एकमेकांचे दृष्टिकोन या दोन भागांतले लोक समजूंच शकत नव्हते. मतभेद मूलभूत स्वरूपाचे होते.

इकडे उत्तर भाग विलक्षण भरभराटला होता. त्याच्यापाशीं कारखाने होते, रेल्वेमार्ग होते, आगबोटी होत्या, आणि वर दक्षिण भागाच्या दुप्पट लोकसंख्या होती. त्या मानानें दक्षिण भाग मागासलेला. मुख्य उद्योगधंदा शेती. कारखाने कमी, रेल्वेमार्ग तुरळक,' लोकसंख्याही म्हणण्यासारखी वाढलेली नव्हती. शेतींत वर्षांतून दोन पिकें काढण्यांत येत. एक कापसाचें आणि दुसरें तंबाकूचें. कापसाचे आणि तंबाकूचे मोठमोठे मळे पसरलेले असत. या मळ्यांवर काम कोण करणार ? मजूर कुठले ? लोकसंख्या कमी, त्यामुळें इथें गुलामांची पद्धत रुजली, फोंफावली. हे गुलाम मळ्यावर उरीं फुटेस्तोंवर राबत आणि मळेवाले गबर होऊन चैनींत रहात. उत्तर भागांतली गडबड धांदल त्यांच्या गांवींही नव्हती.

यादवीआधीं दहा वर्षें, युरोपांतून अमेरिकेला सुमोर वीस लाख लोक आले होते. त्यांच्याजवळ पैसा नव्हता, असलाच तर पुरेसा नव्हता. जगायचें तर कामाची जरूर होती. दक्षिण भागांत त्यांना हें काम मिळूं शकलें नाहीं कारण तिथें गुलाम राबायला होते. म्हणून हे वीस लाख लोक उत्तर आणि पूर्व भागांत जाऊन राहिले. पुढें पश्चिम भाग लोकवस्तीसाठीं खुला झाला. कसायला मोफत जमीन मिळूं लागली. तेव्हां ते पुन्हां उठले आणि या पश्चिम भागांत जाऊन राहिले. इथें वेगानें नवनवीन घटक–राज्यें बनविण्यांत येत होतीं.

या नवीन घटक राज्यांतल्या लोकांना गुलाम नको होते कारण मग त्यांना स्वतःला काम कुठून मिळालें असतें ? सगळ्यांना स्वातंत्र्य असलें पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. त्यांच्या घटकराज्य–समूहाला नांवही होतें 'फ्री स्टेट्स्' ! स्वतंत्र राज्यें. या घडामोडी पाहून दक्षिणेकडल्या लोकांना भय वाटूं लागलें कीं हीं अशीं स्वतंत्र राज्यें उत्तरोत्तर वाढणार तर नाहींत ? मग आपल्याकडल्या गुलामगिरीची, आपल्या निर्घोर, आरामशीर, सुखी जीवनाची धडगत नाहीं. समजा उद्यां कॉंग्रेसमध्यें मतदानाचा प्रश्न आला तर या 'स्वतंत्र राज्यां'च्या बळावर उत्तरेकडचे लोक आम्हां दक्षिणेकडल्या लोकांना चार गोष्टी जबरदस्तीनें सुनावूं शकतील, करायला भाग पाडूं शकतील.

दक्षिणेकडले लोक, सहाजिकच, अस्वस्थ झाले. शिवाय त्यांना मळ्यांसाठीं जास्त जमीन हवी होती. अशी सकस जमीन काय ती नवीन 'स्वतंत्र्य राज्यां' त आणि उटाह आणि न्यु मेक्सिकोच्या भागांत होती. परंतु उटाह आणि न्यु मेक्सिकोचें पाऊसपाणी सोयिस्कर नव्हतें.

दक्षिणेकडल्या लोकांनीं ठरवलें कीं प्रथम संघराज्यांतून विभक्त व्हायचें. स्वतःचें स्वतंत्र सरकार स्थापन करायचें. म्हणजे उत्तरेशीं संबंध नको. त्यांची दादागिरी नको. अमेरिकेचें संघराज्य तसें अद्याप कोवळें होतें, फारसें सशक्त नव्हतें. म्हणजे खरें पाहिलें तर या परिस्थितींत फाटाफुटीनें हानि होणार होती. फाळणी सुखाची ठरणार नव्हती. एकाद्या बलाढ्य देशानें स्वारी केल्यास दोन्ही भागांचें आणि एकूण संघराज्याचेंच अस्तित्व निपटून निघण्याची शक्यता संभवत होती.

परंतु दक्षिणेकडल्या लोकांना हें पटलें नाहीं. त्यांचें म्हणणें, घटक-राज्यांना स्वयंनिर्णयाचा अधिकार आहेच. मग आम्हीं एकत्र रहावें कीं फुटून निघावें तें आमचें आम्ही पाहूं.

संघर्षांचें प्रमाण वाढूं लागलें. एकमेकांचे हक्क काय, गुलामगिरी इष्ट कीं अनिष्ट, यावरून खटके उडूं लागले. उत्तरेकडे कांहीं पुढारी प्रचार करीत होते 'गुलामगिरी मुर्दाबाद ! कुणी कुणाचें गुलाम असता कामा नये ! कुणीही गुलाम बाळगतां नयेत !' आणखी कांहींचें म्हणणें होतें कीं ज्यांच्याकडे ती पद्धत आहेच तिथें ती असूं द्यावी; आपल्याकडे ती रुजूं देऊं नये म्हणजे झालें. दक्षिणेकडेही असे कांहींजण होते कीं ज्यांना फाटाफूट मान्य नव्हती. परंतु त्यांचें म्हणणें हें कीं ज्या त्या राज्याला आपापल्या पद्धतीनें जीवन आंखण्याची मुभा असावी.

१८६० त लिंकन राष्ट्राध्यक्ष झाला. आणि दक्षिण कॅरोलिना संघ-राज्यांतून फुटलें. महिन्याभरांत जॉर्जिया, अलाबामा, फ्लॉरिडा, लुइजिआना, आणि मिसिसिपी हीं राज्येंही फुटून निघालीं. लागलींच टेक्सास बाहेर पडलें. १८६१ च्या फेब्रुआरींत या फुटीर राज्यांच्या प्रति-निधींची मॉंटगोमेरी, अलाबामा येथें बैठक झाली आणि नवीन राष्ट्र स्थापन करण्यांत आलें. कॉन्फेडरेट स्टेट्स ऑफ अमेरिका. नवीन, वेगळी कॉंग्रेस निवडण्यांत आली. वेगळा राष्ट्राध्यक्ष निवडण्यांत आला. हें होतांच कांहीं राज्यांनीं आपल्या आसमंतांतल्या संघराज्याच्या टापूंतल्या गोद्यां ताब्यांत घेतल्या, किल्ले काबीज केले, दारूगोळा लुटला, सार्वजनिक मालमत्तेचें अपहरण केलें.

यामुळें उत्तर भागांतले लोक खवळले. वातावरण तंग झालें. युद्ध अटळ आहे हें सर्वांना कळून चुकलें.

तडकाफडकीच सर्व झालें. संघराज्याची कांहीं फौज दक्षिण कॅरोलिना या फुटीर घटकराज्याच्या चार्ल्सटननजिकच्या फोर्ट सम्टर किल्यांत तळ टाकून होती. दक्षिण कॅरोलिनावाल्यांनीं किल्ल्याचा कबजा मागितला. राष्ट्राध्यक्ष लिंकननें साफ नकार दिला. नव्या कॉन्फेडरेट ऊर्फ फुटीर राज्यांच्या फौजांनीं किल्ल्यावर हल्ला चढवला. किल्ला काबीज केला. उत्तर

कॅरोलिना, व्हर्जीनिया, आरकन्सास, आणि टेनेस्सी हीं सीमेवरचीं राज्यें आतां फुटून या बंडखोर गटाला मिळालीं. आणि यादवी सुरूं झाली.

ही घटना अत्यंत दुर्दैवी आणि भयंकर होती. चार वर्षें ही यादवी चालली होती. दहा लाख जवान मुलें या यादवींत कामीं आलीं आणि जांया झालीं. दक्षिण भागाची तर वाताहत झाली.

उत्तर भागांतल्या कांहीं लोकांना दक्षिण भागांतल्या लोकांबद्दल आपुलकी होती. दक्षिण भागांतल्या कांहीं लोकांना उत्तर भागांतल्या आपल्या सग्यासोयऱ्यांची काळजी होती. परंतु या यादवींत भाऊ भावाशीं लढला, पुत्र पित्याशीं लढला.

यादवीचे पहिले निखारे फुलून तडतडूं लागले तेव्हां क्लारा बार्टन न्यू जर्सींतल्या बोर्डन टाउनमध्येंच होती. इतर अनेकांप्रमाणें तिनेंही या धुसफुशीकडे दुर्लक्ष केलें. वॉशिंग्टनला जातांच मात्र तिला उमजून चुकलें कीं परिस्थिति खरेंच चिंताजनक आहे, ही धुसफूस केवळ धुसफूस रहात नाहीं.

ती घरीं असतांनाच या धुसफुशीचें प्रमाण वाढत होतें. दर महिन्याला वाढत्या कलेनें संघर्ष जाणवत होता. वॉशिंग्टनकडे परत जाण्यापूर्वींच, आपल्या भावाला, स्टीफनला, ती परोपरीनें उत्तर कॅरोलिना सोडून यायला सांगत होती.

स्टीफनची उमर आतां पन्नाशीची झाली होती. उत्तर कॅरोलिनांत त्यानें आपला सारा पैसा गुंतवला होता. तो उत्तर कॅरोलिना सोडून येता तर या पैशाचें पाणी झालें असतें. त्याचे कारखाने, त्याचा जमीनजुमला बळकावण्यांत आला असता. शिवाय संघराज्याच्या फौजेंत भरती व्हायचें तर तें वयही उरलें नव्हतें. ही यादवी फार काळ चालणार नाहीं असाही त्याचा एक कयास होता. आहोंत तिथेंच दाटून रहाण्याचा निर्णय त्यानें घेतला. घरीं त्यानें कळवलें, "माझी चिंता करूं नका."

यादवी फार काळ चालणार नाहीं आणि ती लौकरच संपेल अशी क्लाराचीही कल्पना होती. परंतु फोर्ट सम्टर दक्षिणेकडल्या पक्षाच्या फौजांनीं काबीज केला आणि क्लाराला अनपेक्षितपणें आणि अनपेक्षित

प्रमाणांत यादवीचा वणवा भडकलेला पहावा लागला. ती अस्वस्थ झाली. सैनिक व्हावें ही बालपणापासूनची आकांक्षा उसळून वर येऊं लागली. जो तो तरुण सैन्यांत भरती होत होता. गणवेषांत, शस्त्रसज्ज होऊन फिरत होता. लष्करी बँड वाजत होते, निशाणें उडत होतीं.

" मला सैनिक नाहीं होतां येणार हें कबूल." क्लारानें विचार केला. " परंतु आघाडीवर जाऊन मी जखमी सैनिकांची सुश्रुषा करीन ! "

आघाडीवर आपण कशा जाणार तें तिला अद्याप सांगतां येत नव्हतें. साऱ्या अमेरिकेंत तेव्हां एकही 'ट्रेण्ड' परिचारिका नव्हती. परिचारिकेचें शिक्षण देणारी एकही संस्था अस्तित्वांत नव्हती. परंतु नसली म्हणून काय झालें ? सुश्रुषेची आवड असलेल्या स्त्रिया क्लाराच्या मार्गानें अनुभव मिळवून आपल्या कार्यांत वाकबगार होत आल्या होत्या. त्या आप्तनातलगांची, शेजाऱ्यापाजाऱ्यांची सुश्रुषा करीत. घरीं नेहमीं येणाऱ्या डॉक्टराकडून आवश्यक ती माहिती करून घेत.

यादवी चालू असेस्तोंवर उत्तर आणि दक्षिण भागांतल्या महिलांनीं पिछाडीच्या रुग्णालयांतून जायां सैनिकांची अत्यंत परिश्रमपूर्वक आणि बहुमोल सुश्रुषा केली. तरीही आघाडी कुणाला पहायला मिळाली नव्हती. कधीं पिछाडीच आघाडी बनली तर तेवढाच अनुभव ! स्त्रियांनीं लढाईच्या आघाडीवर जायचें ही कल्पना 'क्रांतिकारक' वाटण्याचा तो काळ होता.

परंतु क्लारानें आपलें कार्यक्षेत्र म्हणून ऐन युद्धक्षेत्रच पक्कें केलें. 'हें तुला शोभणार नाहीं' 'हें तुला जमणार नाहीं' असें ऐकण्याची तिला आतां संवय झालीच होती. असें म्हणून कुणी तिला रोधूं, अडवूं मात्र शकलें नव्हतें. याही वेळीं कोणाला तें शक्य नव्हतें. क्लारा धीमेपणानें आघाडीबाबतची माहिती गोळा करीत होती, योजना आंखत होती, आणि वर वर स्वस्थ होती. या यादवीच्या काळांतलें तिचें देशकार्य केवळ परिचारिका म्हणून तिनें केलें नाहीं, तिनें अधिक कांहीं केलें.

कॉन्फेडरेट फौजा व्हर्जीनिआ आणि मेरीलँडमधून घुसून पुढें निघाल्या होत्या. त्यांना हवें होतें वॉशिंग्टन. वॉशिंग्टनवर त्यांना कबजा करायचा होता. संघराज्याच्या फौजा दक्षिणेकडे निघाल्या होत्या, त्यांना

थोपवायला. शिवाय त्यांनाही कॉन्फेडरेट राज्याची राजधानी रिचमंड काबीज करण्याची ईर्षा होती.

प्रथम वॉशिंग्टनला पोंचली संघराज्याची सहावी मॅसॅच्युसेट्स रेजिमेंट. यांतले जवान वॉर्सेस्टर आणि त्या आसमंतांतल्या खेड्यापाड्यांतले होते. कांहीं खुद्द ऑक्सफर्डचेच होते. वाटेंत बाल्टिमोरमध्यें कॉन्फेडरेट राज्याच्या अभिमानी लोकांनीं त्यांच्यावर हल्ला चढवला आणि हे सैनिक वॉशिंग्टनला पोंचले ते लक्तरें लोंबत असलेल्या, जखमी, भुकेल्या, तहानेल्या स्थितींत. त्यांची छावणीची वेगळी व्यवस्था होऊं शकली नाहीं म्हणून खुद्द राजधानींत वरिष्ठ विधिमंडळाच्या इमारतींत त्यांची सोय करण्यांत आली.

या सैनिकांत आपले परिचित असणार, आपले पूर्वीचे विद्यार्थीही असूं शकतील याची क्लाराला कल्पना होती. त्यांच्यासाठीं आपल्याला काय करणें शक्य होईल हें पहाण्यासाठीं क्लारा तिथें गेली. सगळ्यांची तक्रार एकच होती कीं आंतल्या अंगभर लोकरी अंडरवेअरनें भयंकर उकडायला होतें आहे.क्लारा तिथून निघून गेली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ती पुन्हा परत आली. तिनें बरोबर पांच निग्रो हमाल आणले होते. सुती अंडरवेअर्स आणि अन्नपदार्थांच्या ओझ्यांखालीं ते वांकले होते.

"आणखी कांहीं हवं का?" क्लारानें चौकशी केली.

एका चटपटीत, चलाख सैनिकानें क्लाराच्या काखोटीच्या, वॉर्सेस्टरमधून प्रसिद्ध होणाऱ्या वृत्तपत्राकडे अंगुलीनिर्देश केला. त्याच्या गांवचा तो पेपर होता. "एवढं वाचून दाखवतां का आम्हांला?" त्यानें विचारलें.

क्लारा हंसली. "वा. तेवढ्यासाठींच तर तें मी घेऊन आले." वरिष्ठ विधिमंडळाच्या बैठकीच्या वेळीं उपराष्ट्रपति बसत त्या टेबलाशीं क्लारा गेली. तिथें उभें राहून तिनें तें वृत्तपत्र सर्वांना वाचून दाखविलें. एके काळीं भिडस्त, लाजाळू, संकोची, भित्री असलेली क्लारा शेंकडों रोखल्या नजरांपुढें उभी राहून, तिळमात्र चलविचलित न होतां त्या वृत्तपत्राचें वाचन करीत होती. विधिमंडळाच्या सभागृहांत तिचा खणखणीत, मधुर आवाज स्वच्छपणें उठत होता, पसरत होता, शेंकडों अंतःकरणांत घर करीत होता.

वृत्तपत्राचें तें वाचन संपतांच साऱ्यांनीं तिचा जयजयकार केला.

क्लारा घरीं गेली. वॉर्सेस्टरमधल्या वृत्तपत्रांना तिनें निवेदन पाठविलें, " जखमी आणि पीडित अशा सहाव्या मॅसॅच्युसेट्स रेजिमेंटसाठीं अन्न, कपडे, पुस्तकें, वृत्तपत्रें पाठवा. रेजिमेंट जेथें असेल तेथें हें सर्व पोंचतें करण्याची जबाबदारी माझी. "

या एका निवेदनानें तिनें आपल्याला युद्ध आघाडीवर जायला मिळेल अशी व्यवस्था केली. तिला तरी असें वाटलें.





# १

युद्धआघाडीवर जाणें क्लाराला वाटलें तेवढें सोपें आणि सहजसाध्य ठरलें नाहीं. युद्धखात्याकडून परवानगी हवी होती. परवाने हवे होते. आणि यासाठीं अनेक अधिकाऱ्यांच्या भेटीगांठी घेऊन त्यांची समजूत घालणें आवश्यक होतें. कांहींची समजूत पटली परन्तु कांहीं तयार होईनात. कदाचित् यादवी भडकतांच तिनें उग्र स्वरूप धारण केलें असतें, कांहीं मोठ्या रणधुमाळया झाल्या असत्या तर क्लाराला लौकर परवानगी मिळती. परन्तु यादवी अकस्मात् भडकली तरी लौकर वाढली नाहीं. पसरली नाहीं. ठळक लढाया घडल्या त्या नंतर.

नव्या कॉन्फेडरेट राज्याचा राष्ट्राध्यक्ष जेफर्सन डेविस होता. तो होता या यादवीबाबत इंग्लंड आणि फ्रान्सच्या मदतीवर अवलंबून. ती प्रत्यक्षतः मिळाल्याविना मोठ्या लढायांना तो उत्सुक नव्हता.

संघराज्याला तर यादवी नको होती. त्यांची युद्धाची सज्जता नव्हती. फौज अपुरी होती, साधनें तुटपुंजीं. मोठ्या प्रमाणावर प्रथम सैन्यभरती करणें अवश्य होतें, त्यानंतर त्या सैनिकांना शस्त्रें पुरविणें जरूर होतें; त्यानंतर लढाईचें शिक्षण. संघराज्याच्या फौजेंत बरेच अधिकारी दक्षिणेकडच्या भागांतले होते, यादवी भडकतांच त्यांनीं त्यागपत्रें दिलीं आणि

ते नव्या कॉन्फेडरेट फौजांना मिळाले होते. राष्ट्राध्यक्ष अब्राहम लिंकन अद्याप शांततामय तडजोडीची आशा बाळगून होता.

हें तर सर्व झालेंच. परन्तु प्रतिपक्षाच्या फौजा नेमक्या कुठें आहेत हें दोन्ही पक्षांना माहित नव्हतें ही मुख्य अडचण होती. तेव्हां नव्हते रेडियो, नव्हतीं विमानें, नव्हते टेलिफोन्स कीं नव्हत्या मोटारगाडया. तसा तारायंत्राचा शोध लागलेला होता; परंतु त्याचा तेवढा प्रसार झालेला नव्हता, तें विश्वसनीयही नव्हतें. कधीं काम देई, कधीं देत नसे. सैन्याच्या हालचालींचे खलिते छावण्यांतून वॉशिंग्टनला आणि वॉशिंग्टनमधून छावण्यांना पोंचत ते पायीं वा घोडयावरून जाणाऱ्या येणाऱ्या दूतांमार्फत ! दोन आंधळीं अस्वलें एकमेकांशीं अंदाजानें झुंजावींत तसें या यादवीचें स्वरूप होतें.

या साऱ्या परिस्थितीमुळें पुढल्या सबंध बारा महिन्यांत म्हणण्यासारखी एकच लढाई झाली. ती बुल् रन्ची पहिली लढाई. मॅनासासची पहिली लढाई म्हणूनही ती ओळखली जाते. या लढाईत संघराज्याच्या फौजांचा पराभव झाला.

ही लढाई होइस्तोंवर तिचें स्वरूप, तिचा व्याप क्लाराला माहीत नव्हता. आघाडीवरून वॉशिंग्टनमधल्या रुग्णालयांत जखमी सैनिक आणण्यांत येत,-त्यांच्या सुश्रुषेंत ती मदत करीत होती. हे जखमी सैनिक हकिकती सांगत त्यांवरून ऐन आघाडीवरच परिचारिका असल्या पाहिजेत हें तिला जास्त पटलें.

सैन्यें मजल दरमजल करीत पुढें जात आणि मागून अन्नधान्यें आणि इतर आवश्यक पुरवठा घेऊन खटारे रखडत येत. कित्येकदां हा पुरवठा मैलोगणति मागें राही. दिवसचे दिवस त्याला सैन्याला गांठायला मग लागत. सैन्याबरोबर शस्त्रवैद्य असत. परंतु मागून येणाऱ्या पुरवठ्यांतलीं वैद्यकीय साधनें हातीं आल्याशिवाय, कितीही घायाळ, मरणोन्मुख सैनिक समोर असला तरी त्यांना कांहीं करणें शक्य नसे. जखमी सैनिकांना खटाऱ्यांतून जवळच्या रेल्वेस्टेशनवर वा बोटीच्या धक्क्यावर नेण्यांत येई--अन्नान्न स्थितींत, तहानेनें सुकलेल्या घशांनीं, कुठलेही वैद्यकीय उपचार न करतांच. या सैनिकांचे हे हाल जिवाचें पाणी करणारे होते.

जगण्यासारखे असत ते प्रवासांतल्या या हालअपेष्टांनीं, आत्यंतिक रक्तस्रावानें वाटेंतच मरत. ऐन रणक्षेत्रावर तर जखमांबरोबर भूक तहानेनेंही सैनिक कामीं येत.

कांहीं करून रणक्षेत्रावर गेलेंच पाहिजे असा क्लाराचा निश्चय झाला. युद्धखात्यावर तिनें मागणीपत्रांचा आणि स्मरण-पत्रांचा भडीमार केला. युद्धखात्यांतल्या अनेक बुद्रुकांच्या हट्टाविरुद्ध, दुराग्रहाविरुद्ध तिनें एक लढाईच केली. युद्धखात्याचें आपलें एकच म्हणणें कीं सैन्याला सर्व प्रकारचा पुरवठा विपुल प्रमाणांत चालू आहे, परिचारक वा परिचारिका नकोत. त्यांची गरज नाहीं.

दरम्यान दोन फौजांच्या चकमकी चालू होत्या, लहान लहान हल्ले चालू होते. रोगराई, जखमा, भूक अशा कारणांनीं सैनिकांचे मृत्यु घडतच होते. पुरवठा ‘ विपुल ’ असतांना गरम पांघरुणांअभावी जखमी सैनिक कुडकुडून आणि गारठून प्राण सोडीत.

क्लारा आपली पिछाडीची लढाई चिकाटीनें लढत होती. मॅसॅच्युसेट्सच्या गव्हर्नराकडे ती गेली. त्यानें तिची मागणी बिनशर्त मंजूर होती. सैन्याच्या प्रमुख धर्मोपदेशकाला तिनें पत्रें लिहिलीं. सैन्याला पाठविण्यांत येणाऱ्या पुरवठ्याची व्यवस्था पहाणाऱ्या असिस्टंट क्वार्टर मास्टर जनरल कर्नल रकरशीं तिनें स्नेह जोडला. त्यानें तिच्यासाठीं वाहनांची व्यवस्था करण्याचें वचन दिलें. चहूंकडून क्लाराकडे येणाऱ्या सैनिकोपयोगी साहित्याचा व्याप एवढा झाला कीं क्लाराला एक मोठी कोठीच भाड्यानें घ्यावी लागली. इथल्या अनेक गोष्टी ती कर्नल रकरनें पुरविलेल्या वाहनांतून आसमंतांतल्या जागोजागच्या फौजांना पोंचवी. तिचें नांव सर्वत्र होत होतें. सैनिकांची तिच्यावर भक्ति जडत होती.

आणि मग युद्धखात्यांत कशी आणि कुठें कळ फिरली कोण जाणे; परंतु क्लाराला ऐन युद्धक्षेत्रावर जाऊं देण्याला आवश्यक ते कागदपत्र तयार करण्यांत आले. क्लारा यावेळीं घरीं आपल्या मरणोन्मुख वडिलांच्या उशाशीं होती. ही नवीन घडामोड तिला माहीतही नव्हती.

१८६२ च्या मार्चमध्यें क्लाराचे वडील कॅप्टन बार्टन परलोकवासी झाले. मरणसमयीं क्लारा, तिचा भाऊ डेविड आणि बहिण सॅली त्यांच्याजवळ होती. स्टीफनची कांहींच वार्ता नव्हती. त्याचें काय झालें तें कोणालाच माहीत नव्हतें. क्लाराच्या वडिलांचें तसें वयही बरेंच झालें असल्यानें क्लारानें पुढल्या अपरिहार्य घटनेसाठीं मनाची तयारी ठेवलीच होती. त्यांनीं अधिक जगावें असें म्हणायला आतां जागाच नव्हती.

त्यांच्या उत्तरक्रियेच्या दिवशींच युद्धखात्याकडले परवाने क्लाराच्या हातीं आले. आतां युद्ध आघाडी तिला खुली होती. तिच्या कार्यासाठीं तिला सर्व प्रकारचें सहाय्य उपलब्ध व्हावें असेही हुकूम सैन्यांत सुटले होते. कुणालाही सोबत घेण्याची मुभा क्लाराला देण्यांत आली होती.

आज हें जमणार नाहीं. युद्धाचें तंत्रच आज बदललें आहे, गुंतागुंतीचें झालें आहे. आज युद्धक्षेत्रावर असें कोणाला मोकळें सोडण्याची कल्पनाही मूर्खपणाची मानण्यांत येईल.

तेव्हां देखील हें क्लाराला खरें वाटेना. वडिलांची उत्तरक्रिया आणि ही आनंददायी घटना. सहसा न रडणारी क्लारा त्या दिवशीं घळघळा, ढसढसा रडली.





# १०

क्लाराचें युद्धक्षेत्रावरचें पहिलें वर्ष अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें ठरलें. तिचें तेथलें कार्य तर महत्त्वाचें होतेंच परंतु तिला तेथें शिकायला मिळालें तेंही महत्त्वाचें होतें.

दोहीं पक्षांना आतां कळून चुकलें होतें कीं ही यादवी लौकर संपत नाहीं. बाहेरच्या कोणा देशाची मदत अशक्य आहे आणि आपलें आपल्यालाच लढून काय तो निकाल केला पाहिजे. कॉन्फेडरेट पक्षाचा अद्याप वॉशिंग्टनवर रोख होता. संघराज्याच्या फौजांनाही रिचमंड काबीज करायचें होतें.

यादवीच्या दुसऱ्या वर्षांत व्हर्जीनिया आणि मेरीलँडमध्यें महत्त्वाच्या धुमश्चक्र्या उडाल्या.

प्रत्येक लढाईच्या वेळीं क्लारा तिथें हजर होती, नवनवीन गोष्टी शिकत होती, अनुभवांनीं समृद्ध होत होती. तिच्या कार्यांत सफाई आली, सुसूत्रता आली.

तिचा पहिला मौलिक पाठ : १८६२ च्या सेप्टेम्बरमधली बुल् रनची दुसरी लढाई. फेअरफॅक्स, व्हर्जीनिया नजीक ती झाली. फेअरफॅक्स स्टेशनालगतच्या उतारावर तीन सहस्र जांया आणि भुकेले सैनिक कण्हत

विव्हळत पडलेले होते. दोन मैलांच्या अंतरावर पलिकडे बुल-रन नांवाच्या ओढ्यानजीक प्रत्यक्ष लढाई चालू होती. गवताच्या गांसड्या फोडून त्यांतल्या गवतावरच जांया सैनिकांना ठेवण्यांत आलें होतें.

क्लारानें आपल्यासोबत मिसेस फेल्स नांवाच्या स्त्रीला घेतलें होतें. आल्याबरोबर एक क्षणही न गमावतां दोघींनीं स्वयंपाकाचीं उपलब्ध असलेलीं सर्व साधनें गोळा केलीं; आणि दोघी एकमेकींकडे भयभीत होऊन पहात राहिल्या.

सगळें मिळून साहित्य झालें होतें दोन बालड्या, टिनचे पांच कप, एक मोठी किटली, एक पातेलें, दोन कंदील, पाव कापण्याच्या चार सुऱ्या, तीन थाळ्या आणि एक परात. आणि खायला घालायचें होतें तीन सहस्र लोकांना !

नंतर या प्रसंगाबद्दल क्लारानें एका मैत्रिणीला लिहिलें आहे, "कुठल्याही कामाची आगाऊ तयारी मला या वेळीं माहीतच नव्हती. मी शिकलें ती दुःखद अनुभवांनीं, खूप मननानें. पुन्हा असल्या विलक्षण प्रसंगांत मी कधींच सांपडलें नाहीं."

ती पुढें लिहिते, "वाऱ्याचा उपद्रव तुम्हां साऱ्यांच्या अनुभवाचा आहे. माझ्याही होता. परंतु त्याचा खरा प्रत्यय इथेंच आला. चुलाणा पेटवून त्यावर स्वयंपाक करण्याचा प्रयत्न इथें करूनच पहावा. कुठल्याही दिशेला बसा, वारा तुमच्या नाकाडोळ्यांत धूर सोडून तुम्हाला नक्की गुदमरविणार.

"तथापि याही स्थितींत, इथें आल्यापासून पंधराच मिनिटांच्या आंत आम्ही स्वयंपाकाला लागलों. सैनिकांच्या जखमा धुवून बांधण्याचें कामही चालू केलें. आम्ही स्वयंपाक काय केला असेल, कसा केला असेल आणि कसा वाढला असेल तें जाणून घेण्याची तुला उत्सुकता असेल. परंतु सध्यां ती तशीच ठेव..."

क्लारानें काय केलें ? लोकांनीं सैनिकांसाठीं दिलेल्या अन्नधान्यांचा, वस्तूंचा, फळफळावळीचा मोठा सांठा तिच्याबरोबरच स्टेशनवर येऊन पडला होता. तो तिनें रिता केला आणि हातीं आलीं तीं भांडीं, खोकीं, ताब्यांत घेतलीं. सैनिकांनीं या "ताटां"त खाल्लें.

बरोबर घेतलेल्या अनेक वस्तू युद्धआघाडीवर कशा निरुपयोगी ठरतात हेंही तिला यावेळीं समजलें. तर मग युद्धआघाडीवर उपयोग तरी कशाचा होतो ? हें मात्र तिला अनुभवानेंच समजायचें होतें.

उन्हातान्हांत त्या दोघींनीं दिवसभर काबाडकष्ट केले आणि रात्रीं नवीनच बिकट परिस्थिती दत्त म्हणून उभी राहिली. क्लारानेंच तिचें वर्णन केलें आहे.

"जमिनीवर सर्वत्र गवत वाढलें होतें. आमच्याकडे कंदील दोनच असले तरी मेणबत्त्या बऱ्याच होत्या. जखमी सैनिक तर एकमेकांना चिकटून चिकटून पडलेले होते त्यामुळें अंधारांत अंदाजानें कुठेंही जाणें येणें धोक्याचें होतें. एकादें पाऊल जरी इकडे तिकडे पडलें तरी एकादा दुखावलेला जखमी सैनिक विव्हळून उठे. म्हणून मग या टापूंत हिंडणारे मेणबत्त्या घेऊन हिंडत होते. कुणी काळजीपूर्वक तर कुणी निष्काळजीपणें. जरा एकादी मेणबत्ती गवताला लागती तर तो सारा भाग पेटून ते सारे जखमी जीव होरपळले असते. आम्ही सारख्या सर्वांना सावधानतेच्या सूचना देत होतों. जातीनें लक्ष ठेवीत होतों. कुडकुडणाऱ्या जांया सैनिकांच्या पायांत आम्ही मोजे घातले, त्यांच्या अंगाभोंवतीं तुम्ही सर्वांनीं दिलेलीं गरम पांघरुणें लपेटलीं. आणि तींही संपलीं तेव्हां गवत उपटून त्यानें उरलेल्या गारठत्या देहांना ऊब दिली."

क्लारा पुढें लिहिते,

"सोमवारीं शत्रुपक्षाचें कांहीं घोडदळ समोरच्या झाडींत आल्याचें कळलें. कुठल्याही क्षणीं हल्ला अपेक्षित होता. दुपारीं जखमी हलविण्यांत येऊं लागले. माझ्याबरोबरची फेल्सबाईही मनोमन घाबरली आणि कांहीं कामाच्या निमित्तानें निघून गेली. मी मात्र जायचें नाहीं असें ठरवलें. पकडले गेलें तरी बेहत्तर; पण एकही जखमी माणूस इथें शिल्लक असतांना मी इथून निघणार नाहीं हा निश्चय झाला.

"संध्याकाळीं सहाच्या सुमाराला समोर तोफखान्याचा धडाका सुरूं झाला. बंदुकांच्या गोळयाही येऊं लागल्या. आम्हीं आमच्या तंबूत बसून हल्लेखोर लोक चालून येतील म्हणून प्रतीक्षा करीत होतों. परंतु

आमच्या आणि हल्लेखोरांच्या दरम्यान होती मॅसॅच्युसेट्स्ची २१ वी पराक्रमी पलटण. हल्लेखोर आमच्यापावेतों येऊंच शकले नाहींत. दुसऱ्या दिवशीं उजाडतां आम्ही नवीं हजार जखमी माणसें आगगाडींत भरलीं आणि कूच केलें."

ही मंगळवारची गोष्ट. शनिवारपासून तोंपर्यंत क्लाराला जेमतेम दीड एक तासाची झोंप मिळाली असेल, नसेल. परंतु पत्र संपवतांना ती सांगते कीं "आतां मी अगदीं ताजीतवानी झाले आहे. पुन्हां कामाला लागेन म्हणतें."





# ११

आज युद्धआघाडीवर परिचारिकांचा पोषाक सुटसुटीत आणि सोयीचा असतो. परन्तु त्या काळीं घागऱ्यासारखा घोळ असलेला पायघोळ झगा न वापरणारी कुठलीही स्त्री अकुलीन आणि कुचेष्टेंचा विषय मानली जाई. या पायघोळ झग्यांना ' हूप स्कर्ट्स ' म्हणत. स्त्री स्वयंपाकघरांत वावरत असली तरी ती या असल्या झग्यांत असे. ' क्रिनोलाइन ' नांवाच्या चिवट पदार्थाच्या उपयोगानें या झग्याचा घोळ फुगवलेला असे. आणि झग्याचा शेव थेट भुईला लोळत असे. स्त्रीचे घोटे दिसणें म्हणजेच असभ्यपणाचा मूर्तिमंत कळस मानला जाई.

क्लाराचा युद्धआघाडीवरील पोषाक म्हणजे ' क्रिनोलाइन ' चा कृत्रिम फुगवटा नसलेल्या घागऱ्याचा झगा आणि साधा काळा पोलका. झग्याचा शेव भुईला स्पर्श न करील एवढाच लांब. सुटसुटीतपणाच्या हिशेबांत तत्कालीन रुढीना धरून, क्लारा एवढेंच करूं शकली. स्वतः- बरोबर स्वतःचें असें सामान तिनें केवळ एका झोळींत राहील एवढेंच घेतलेलें असे.

चांटिलीची लढाई होऊन संघराज्याच्या फौजांना आणखी एक

पराभव पदरीं घ्यावा लागला. ही लढाई बुल् रनच्याच अगदीं नजीक झाली.

लढाईच्या आरंभालाच क्लारा आघाडीवर दाखल झाली. पुन्हा त्याच त्या फेअरफॅक्स स्टेशनाशीं आपण आलों हा योगायोग तिलाही जाणवला. या वेळीं तिच्याबरोबर एकीऐवजीं दोन सहकारी स्त्रिया होत्या. स्वयंपाक-सुश्रुषेचें साहित्य मुबलक होतें, कंदिल हवे तेवढे होते.

क्लाराची छावणी प्रत्यक्ष युद्धापासून २ मैल मागें होती. युद्धापासून दूर रहाणेंही क्लाराला बरें वाटत नव्हतें. युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींतच आपण अधिक सैनिकांचे प्राण वांचवूं शकूं हा विचार तिला बेचैन करीत होता. परंतु तिथें जायचें कसें? जांया सैनिकांची रीघ तर एव्हांनाच लागून होती.

त्या तिघींनीं आपल्या कामाला आरंभ केला आणि मध्यंतरी केव्हां तरी जवळच पलिकडे, उजव्या हाताचा लोळागोळा झालेला एक जखमी सैनिक पहुडलेला क्लाराला दिसला. त्याचे कपडे मनस्वी फाटले होते आणि तो थंडीनें कुडकुडला होता. क्लारा त्याच्यापाशीं गेली. तिनें त्याचा फाटका खमीस त्याच्या उघड्या छातीवर नीटनेटका करूं पहातांच त्यानें आपला धडका हात तिच्याभोंवती टाकला आणि तो लहान मुलासारखा स्फुंदूं लागला. क्लारानें त्याचें मस्तक आपल्या हातीं धरून, तें कुरवाळून त्याला उगीं केलें.

"तुम्ही—तुम्ही ओळखत नाहीं मला?" त्यानें विचारलें. "तुमचीं पुस्तकं मी शाळेपासून तुमच्या घरापर्यंत घेऊन येत असे."

क्लाराला आठवलें. तिनें शिक्षकिणीचा पेशा ज्या शाळेंत प्रथम पत्करला तेथल्या चार दांडगट मुलांपैकीं तो एक होता. क्लाराला भड-भडून आलें. आतां हा मुलगा त्याच्या उजव्या हातानें कधींही कांहीं वाहून नेऊं शकणार नव्हता. तो थोटा होणार होता—थोटा!

त्या तीन परिचारिकांनीं नेहमींसारखें रात्रभर काम केलें. पहांटे तीनच्या सुमाराला एक शस्त्रवैद्य हातांत मेणबत्ती घेऊन क्लाराला शोधत आला.

" बाई, " तो म्हणाला, " जरा माझ्याबरोबर येतां का ? तिथें टेकडीवर एक तरुण मुलगा जबर जखमी होऊन पडला आहे आणि तो त्याच्या ताईला सारखा हांका मारतो आहे. त्या करुण हांका आम्हांला ऐकवत नाहींत. पण आम्ही काय करणार ? "

क्लारा त्या शस्त्रवैद्यापाठोपाठ चालू लागली. टेकडीवर आली. तिथें कांहीं मेणबत्त्या एका जागीं मिणमिणत होत्या. कांहीं माणसें घोळक्यानें उभीं होतीं. भ्रमिष्ट आकांत कानीं येत होता, " मेरी ! मेरीताई ! मी एकटा मरतों आहे ग. मी एकटा यमयातना सोसतों आहे. कुठें आहेस तूं ? कुठें आहेस ? " हें ओरडणाऱ्या जिवाला भोंवतालच्या घोळक्याचा पत्ताही नव्हता.

जमिनीवर तो उताणा पडला होता. आपले दोन्ही हात त्यानें उराशीं आवळले होते. ते रक्तानें माखले होते. बुबुळें इतस्ततः फिरवीत तो विव्हळत, आरडत ओरडत होता.

क्लारानें सर्वांना मागें होण्याला खुणावलें. त्याच्या एका बाजूला ती वांकली. गुडघे टेकून बसली. काळोखांत. निःस्तब्धपणें. तिनें त्याचे पंजे हातांत घेतले. आणि त्याच्या कपाळाचें हळूवारपणें चुंबन घेतलें.

तो आनंदून ओरडला, " मेरी ! मेरी ! मेरीताई ! माझी मेरीताई ! मला वाटलंच होतं कीं तूं येशील ! आतां मरणाला मी भीत नाहीं. आतां प्रत्यक्ष यमालाही मी भीत नाहीं ग ताई. ताई, तूं किती चांगली आहेस !"

क्लारानें त्याच्या मुखांत थोडेंसें मद्य घातलें त्याला एका रजईत गुंडाळलें. नीट बसून त्याचें मस्तक आपल्या मांडीवर घेतलें. त्याच्या-भोंवतीं आपल्या बाहूंची मिठी गुंफली. आणि ती तशीच मग बसून राहिली.

" मेरीताई...मेरीताई..." असें पुटपुटत तो तरुण मुलगा अशक्त-पणाच्या गुंगींत गाढ झोंपी गेला. तीन तास क्लारा तिथें तशी बसून होती.

त्याला जाग आली तेव्हां पहांट झाली होती. आतां भ्रम नव्हता, भीति नव्हती, अंधारही नव्हता. त्यानें मांडीवरचें मस्तक चाळवलें. वर,

क्लाराकडे पाहिलें. तो निराशेनें कळवळला. " नाहीं—मेरीताई नाहींच! मला वाटलंच होतं! कशी येणार इथं मेरीताई! तुम्ही–तुम्ही कोण?"

" एक स्त्री. तुम्हांला बरं वाटावं म्हणून मनापासून इच्छा करणारी."

क्लारानें मग शस्त्रवैद्याला बोलावणें धाडलें.

त्या जखमी सैनिकाला फेअरफॅक्स स्टेशनवर नेऊन आगगाडींत ठेवण्यांत आल्यानंतरच क्लारा परत आपल्या कामाला गेली.

एका परिचिताला लिहिलेल्या पत्रांत ती म्हणते, " मी अशी एकाच माणसापाशीं गुंतले होते म्हणून आमच इतर काम मात्र मंदावलं नाहीं वा बंदही पडलं नाहीं. माझ्या दोघा सहकारिणींनीं दुप्पट वेगानें आपापलं काम या काळांत चालू ठेवलं."

पुढें तो दिवसभर त्या तिघींच्या खस्ता चालू होत्या. गाड्या भरभरून जखमी सैनिक येऊन पोंचत होते. बहुतेकांच्या अंगांत भुकेनें आणि रक्तस्त्रावानें, त्राण उरलें नव्हतें. तरीही त्यांची रुग्णालयांत नीट व्यवस्था आणखी निदान एक दिवस होणार नव्हती. खायलाही लागलींच कांहीं देता येण्यासारखें नव्हतें. कारण आधींचे जखमी होतेच. त्यांची गचडी झालेली असे. त्यांत ही नवी भर पडली असती. साऱ्यांचेच आबाळ झाले असते.

क्लारा वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे गेली. तिनें एक सूचना केली. गाड्यांमध्येंच या सैनिकांची निदान जुजबी खाण्यापिण्याची आणि प्रथमोपचाराची व्यवस्था व्हावी. मग क्लारा या गाड्यांतून फिरूं लागली. खाद्यपदार्थ घेऊन. प्रथमोपचारांचें साहित्य घेऊन. या तिच्या धांवपळीनें अगणित सैनिकांना जीवदान मिळालें असेल.

त्या दिवशीं संध्याकाळीं युद्धाला खळ पडल्यानें, एक दिवसाची उपाशी क्लारा आपल्या सहकारिणींसमवेत थोडेंसें खात होती. अशा वेळीं तोफखान्याचा भडीमार, शत्रुसैन्य, वादळ आणि जखमी सैनिकांची एक गाडी, असें सर्व एकदमच तिथें येऊन पोंचलें.

त्या तिघा स्त्रियांचें खाणें मग अर्धवटच राहिलें हें वेगळें सांगायला नको.

कांहीं काळपर्यंत तरी संघराज्य–फौजेनें शत्रुसैन्याला थोपवून धरलें. क्लारा आपल्या दोघी सहकारिणींसमवेत जोराच्या वादळपावसांत आणि विजेच्या आणि तोफखान्याच्या गडगडाटांत कार्यमग्न होती. अखेर क्लाराच्या सहकारिणींचा धीर खचला. एक तर सरळ एका आगगाडींत चढली ! दुसरी क्लाराच्या तंबूंत शिरून गाढ झोंपली. पावसाच्या मुसळधारेंत एकटी क्लारा साऱ्या कामाला पुरी पडत होती—अखेरचा जखमी सैनिक आगगाडीनें पिछाडीला रवाना होईपर्यंत ! मग तोफखानाही धडधडायचा थांबला.

टेकडीच्या एका कुशीच्या खोलगट भागांत क्लाराचा तंबू होता. काम संपवून क्लारा अंधारांत पडत धडपडत आणि ठेंचाळत त्या तंबूकडे गेली. क़नात वर करून आंत शिरली. आणि आंत ? आंतून एक झरा, पावसाळी पाण्याचा चांगला प्रवाहच, वहात होता ! तिची सहकारी परिचारिका तंबूंतल्या एकच एक उंच लाकडी पेटीवर डाराडूर झोंपली होती.

क्लाराला स्वतःला शरीर टेकायला जागाच उरली नव्हती. परंतु थकवा तर मनस्वी आला होता. मग ती ऐन प्रवाहांतच आडवी झाली आणि झोंपी गेली !

प्रथम पाणी नाकातोंडांत जाऊं नये म्हणून तिनें डोकें मानेपासून वर उभें धरून ठेवण्याची शिकस्त केली. परंतु झोंपेचा अंमल चढतांच हीही काळजी उरली नाहीं. दोन तास तशी ती झोंपून होती. जागी झाली तेंव्हां जरा हुषारी आणि तरतरी वाटत होती. तिनें केंसांतलें आणि कपड्यांतलें पाणी पिळून काढून टाकलें आणि ती कामासाठीं तंबूबाहेर चालूं लागली.

आणखी जखमी सैनिक घेऊन नवीन गाड्या येऊन थडकत होत्या. पाऊस खळला होता आणि तोफा थंडावल्या होत्या. तरी पण बातमी अशी होती कीं कॉन्फेडरेट सरकारचे सैनिक जवळपासच वावरत होते.

अत्यंत थकल्याभागलेल्या आपल्या एकुलत्या एका सहाय्यक परिचारिकेला क्लारानें गाड्यांतल्या जखमींची सुश्रुषा करण्याचें काम नेमून दिलें आणि पुन्हां ती ऐन आघाडीशीं उपस्थित झाली.

कोठल्याही क्षणीं कैद होऊं अशी शक्यता होती. जखमींची पूसतपास करीत ती फेअरफॅक्सच्या रेल्वेस्टेशनापासून लांब लांब जात अखेर, स्टेशन म्हणजे केवळ एक ठिपका दिसावा इतकी लांब गेली.

पहांटेच्या सुमाराला संघराज्य सेनेंतला एक घोडदळ अधिकारी दौडत आला.

"मिस् बार्टन," तो म्हणाला, "घोड्यावर बसतां येईल तुम्हांला?"

"येईल."

"माझ्या या घोडयावर बसाल तुम्ही?"

"हो. अगदीं रिकिबीशिवायसुद्धां."

बालपणचा अश्वारोहणाचा अनुभव या उत्तरामागें उभा होता.

अधिकारी एक निश्वास टाकून म्हणाला, "तर मग अजून अर्धा तास चालूं द्या तुमचं काम."

क्लारा अत्यंत वेगानें आपलें काम आवरूं लागली. एकूण एक जखमी सैनिक, जखमा बांधून, पिछाडीच्या रुग्णालयाकडे जाणाऱ्या आगगडींत भरतां आले पाहिजेत अशी तिची इच्छा होती. असा तिचा प्रयत्न होता. शेवटच्या सैनिकाची रवानगी आगगाडींत होत आहे तोंच तो घोडदळ अधिकारी वायुवेगानें दौडत आला. घोड्यावरून तो उडी मारतो आहे तों कॉन्फेडरेट सरकारच्या सैनिकांची एक मोठी झुंड टेकडीमागून आपल्या दिशेनें घरंगळत उधळत आल्याचें क्लाराला दिसलें.

"आगगाडी पकडा, आगगाडी"-अधिकारी सुचवित होता. "आतां सुटते आहे ती. ती मिळाली नाहीं तर घोडयावरून पळण्याचा प्रयत्न करावा लागेल तुम्हांला."

निमिषभरांतच क्लारानें घोडयावर मांड ठोकली. लगाम हातीं घेतले आणि घोडयाला टांच मारली.

वायुवेगानें ती नाहींशी झाली.

• • •



# १२

चांटिलीची लढाई आटपली आणि जेमतेम आठवडाही उलटला नसेल तों वॉशिंग्टनमध्यें क्लाराला कळलें कीं ऐंशी मैल अंतरावर, पश्चिम व्हर्जिनियांतल्या हार्पर्स फेरी या ठिकाणीं नवी लढाई जुंपण्याचा संभव निर्माण झाला आहे. कदाचित् तिला मिळालेली ही माहिती चूकही ठरली असती; परंतु माहिती होती ही अशी होती.

तडक ती खेंचरांवर आवश्यक तें सामान लादून तिकडे निघाली. दिवसा रखडत, ठेंचाळत चालायचें; रात्र पडेल, मार्गच दिसेनासा होईल तिथें विसावायचें. यावेळीं बरोबर कुणी परिचारिका नव्हत्या—होते केवळ ४ पुरुष. कर्नल रकरनें रक्षक आणि दूत म्हणून नेमून दिलेले.

तिची माहिती चुकीची असल्याचें नंतर आढळून आलें. हार्पर्स फेरीच्या टापूंत लढाई होण्याची शक्यता नव्हती. एक किरकोळ चकमक उडाली होती तीही अजून पुढें. या चकमकींतले जखमी आणि जाया सैनिक मार्गांत क्लाराला भेटले. कुणाच्या अंगावर संघराज्याच्या सेनेचा निळा गणवेष तर कुणाच्या अंगावर कॉन्फेडरेट सेनेचा राखी गणवेष. पण सारेच भुकेनें वखवखलेले होते. साऱ्यांना क्लारानें आपल्याबरोबरचें

अन्न दिलें. वाटेंत अशा सैनिकांना खाऊं घालायचें आणि पुन्हा एकादें गांव आलें कीं तिथें नवीन अन्न जमा करायचें असा तिचा क्रम चालला होता.

एक दिवशीं सकाळीं तिला संघराज्य रेल्वेची एक दहा मैल लांब मालगाडी दारूगोळा, अन्न, कपडे, वैद्यकीय साहित्य असें सर्व घेऊन कुठें-तरी चाललेली आढळली. क्लाराच्या लक्षांत आलें कीं एकाद्या संभाव्य युद्ध-आघाडीकडे ही नेण्यांत येत असावी. तिनें ठरवलें, या गाडीसोबत जायचें. उन्हांतून आणि धुळींतून क्लारानें दिवसभर त्या गाडीची सोबत केली. रात्रीं ती थांबली तेव्हां क्लाराही थांबली.

रात्रीं बरोबरीचे चार लोक दिवसभराच्या श्रमांनीं गाढ झोंपले; परन्तु क्लारा जागी होती. तारे न्याहाळत, रात्रीचे दीर्घ श्वासोच्छ्वास ऐकत. पानांची सळसळ. मग धातूच्या सांखळयांची खळखळ. मग कुठें तरी कांहीं ठिणग्या. लांबवर कुत्र्यांचें रडणें. वाऱ्याच्या झुळुकेसरशीं कुठला तरी शेकोटीचा धूर तिच्या आसपास तरळत येत होता.

संघराज्याचा विजय व्हावा म्हणून क्लारा मनोमन परमेश्वराची प्रार्थना करीत होती. आतांपर्यंत मिळत होते पराभव. दर वेळीं आघाडीपासून दहा दहा मैल मागें रहायचें—आणि आघाडीवरचें वृत्त केवळ ऐकायचें. त्यांत शेवटली वार्ता पराभवाची, माघारीची. क्लाराला वाटलें, तिथें—थेट आघाडीवर जायला हवें. तोफा जिथून धडधडतात तिथें. गोळया जिथें सणसणतात तिथें. माणसाला माणूस श्वापदासारखा झोंबतो तिथें. माणसाच्या ऊन ऊन रक्ताचे पहिले थेंब ठिबकतात तिथें. आपलें स्थान, आपलें कार्य तिथें आहे. पण तिथें जायचें कसें ?

तिला वडिलांची आठवण झाली. त्यांनीं तिला याचें उत्तर सांगितलें असतें. मार्गदर्शन केलें असतें. उत्तेजन दिलें असतें. बालपणच्या लुटूपुटूच्या लढाया तिच्या नजरेसमोर धांवत आल्या. युद्धांतल्या दोन फौजांऐवजीं रजईच्या रणक्षेत्रावर मांडलेले धान्यांचे दाणे तिला स्मरले. त्यांतले कांहीं दाणे ती हलवी. कांहीं तिचे वडील.

ती उठून बसली.

तिला कांहींतरी सुचलें.

हंसतमुखानें तिनें आपल्याबरोबरच्या माणसांना जागें केलें.

" चला. आपण पुढें जायचं. " ती म्हणाली.

झोंपेनें ते पेंगुळलेले होते. झोंपमोडीमुळें सुन्न झालेले. त्यांना याचा अर्थच कळत नव्हता. परंतु 'बाईसाहेबां' चा हुकूम तो. ते धडपडत आपापल्या चिरगुटांतून उठले. त्यांनीं खेंचरें लादून तयार केलीं. एव्हांना क्लारानें कॉफी बनवून सर्वांना दिली.

मग रात्रभर त्यांचा तांडा पलिकडच्या उभ्या मालगाडीला समांतर चालला होता. पहांटें त्या मालगाडीला त्यांनीं मागें टाकलें. आतां मार्ग अगदीं खुला होता. सेप्टेंबरमधल्या तळपत्या उन्हांत दिवसभर ही मंडळी भाजून निघत होती. दिवस मावळतां मावळतां ती अँटीएटॅम नजीकच्या पोटोमॅकच्या ८० सहस्र सैनिकांना जाऊन मिळाली. मग रात्रीं शेंकडों शेकोट्यांत याही मंडळीची एक शेकोटी पेटलेली होती.

" आतां मात्र खुद्द आघाडीच. " क्लारा मनाशी ठरवीत होती. " तोफा जिथून धडधडतात तिथें ! "





# १३

अँटीएटॅमच्या लढाईंत संघराज्य सेनेला प्रथमच ठळक विजय मिळाला. तरी पण लढाई मोठी घनघोर झाली. जवळ जवळ आठ मैलांच्या आघाडीवर १२४,००० माणसें आणि तोफखाना समोरासमोर युद्धसज्ज होऊन उभा होता.

दिवस उजाडतांनाच लढाईला तोंड लागलें. क्लाराला सारें दुर्बिणीमुळें पहायला मिळत होतें. आपली अधिक गरज कुठें भासेल तें तिला शोधायचें होतें. आघाडीच्या उजव्या बाजूला टोकाशीं तिला दिसूं लागलें कीं संघराज्याचें सैन्य हटतें आहे. घोडदळ आणि तोफखाना त्या बाजूला सहाय्यार्थ धांवला.

क्लारानें आपली गाडी गांठली. 'त्यांच्या पाठोपाठ चल.' तिनें गाडीवानाला फर्मावलें.

अखेरची तोफ उभी केली होती त्या भातशेतापर्यंत ती गेली. शेतानजीकच एक घर होतें, एक कोठी होती. प्रशस्त अंगणांत सुमारें तीनशें माणसें पडलेलीं तिनें पाहिलीं. सोप्यावर शस्त्रवैद्य आपली कामगिरी बजावीत होते. क्लारानें बॅंडेजेस घेतलीं, ड्रेसिंग्ज घेतलीं, मद्य घेतलें आणि

भाताचीं रोपें तुडवीत ती तोफांच्या कानठळया फोडणाऱ्या गडगडाटांत, डोक्यावरून तोफगोळे सणसणत असतांना, आजूबाजूनें जीवघेणीं काडतुसें भिनभिनत असतांना आणि त्यांनीं भाताचीं रोपें खुडलीं, छिन्नभिन्न केलीं जात असतांना दृष्टिपथांतल्या त्या अंगणाकडे, सोप्याकडे निघालीं.

तिला पहातांच शस्त्रवैद्य थक्क झाले. डोळे ताणून ते तिच्याकडे पहात राहिले. त्यांच्याजवळचा बाकी पुरवठा संपला होता. होतीं हत्यारें आणि क्लोरोफॉर्म. जखमा बांधण्यासाठीं ते भातरोपांचीं पातीं वापरीत होते. सर्व प्रकारचा पुरवठा घेऊन येणारी मालगाडी अद्याप आलेलीच नव्हती. आणि आवश्यक त्या साऱ्या साहित्यासह क्लारा या धुमश्चक्रींत येऊन हजर झाली होती !

क्लाराचें सहर्ष स्वागत झालें.

दिवसभर क्लारा खपत होती. सैनिकांची आई, बहीण, मुलगी होऊन त्यांच्या उपयोगी पडत होती. दिवसभर युद्ध घुमत होतें. जयापजयाचें पारडें वेडेंवांकडें होत होतें, हिंदकळत आणि हादरत होतें. शेंकडोंनीं जखमी माणसें माघारी आणण्यांत येत होतीं. गर्दी वाढत होती. तोफखाना जवळच धडधडत असल्यानें त्याचा धूर इथें येऊन सांचत होता, दोन पावलांपलिकडचें कांहीं क्लाराला दिसणें अशक्य होत होतें. तशाही स्थितींत ती जखमी सैनिकांतून फिरत होती.

एकानें ‘ पाणी ’ ‘ पाणी ’ करीत तिच्या झग्याचा शेव पकडला. ती खालीं वांकली आणि त्याचें मस्तक ती उचलीत असतां एका गोळीनें तिचा झगा फाडून त्या सैनिकाच्या छातीचा ठाव घेतला—जागच्या जागीं त्याचा प्राण गेला. उचललेलें तें मस्तक तसेंच खालीं ठेवून क्लारा पुढें गेली.

कोठीच्या दाराशीं आणखी एकानें तिला रोखलें.

“ अहो, ” तो कण्हत म्हणाला, “ माझ्या चेहऱ्याची अशी आग कशानें होते हो ? ”

क्लारानें त्याचें मुख न्यहाळलें. जबड्यांत गोळी घुसली होती. तिथलें

मांस फुटून निघालें होतें. तिनें हें सांगितलें तेव्हां तो म्हणाला, "मग कापून बाहेर काढा एवढी गोळी."

"मी शस्त्रवैद्यांना सांगते." क्लारा म्हणाली.

"नको नको." तो अजीजीनें म्हणाला. "लहान तर जखम आहे. माझी पाळी येण्याची वाट पहायला हरकत नाहीं; पण कळा सहन होत नाहींत हो. आगीनें होरपळायला होतें. तुम्हीच काढा गोळी. दया करा!"

"नाहीं नाहीं" क्लारा कळवळून म्हणाली. "माझ्याच्यानें नाहीं व्हायचं तें. तुम्हांला यातना नाहीं देववणार माझ्याच्यानें."

"अहो या गोळीपेक्षां तुम्ही द्याल त्या यातना खचित कमी असतील. दया करा आणि काढा ही. काढाच."

क्लारानें दीर्घ श्वास घेतला. मन घट्ट केलें. जवळचा चाकू उघडला. दोन्ही मांड्यांत गोळ्या घुसलेला बाजूचा एक सार्जंट कसाबसा बसता झाला आणि म्हणाला, "मी—मी मदत करतों."

प्रयासांनीं तो जवळ सरकला आणि त्या जखमी सैनिकाचें मस्तक त्यानें हातांत घट्ट धरलें. क्लारानें चाकूनें खरवडून तिला जमली तशी गोळी काढली आणि जखम धुवून बांधून टाकली.

तिनें म्हटलें आहे, "माझ्या त्या शस्त्रक्रियेला कोणी शास्त्रशुद्ध शस्त्रक्रिया म्हटलें नसतें. परंतु नंतर त्यामुळें त्या सैनिकाला जो आराम वाटला आणि ज्या कृतज्ञतेनें त्यानें मला दुवा दिला ती पहाता ती यशस्वी शस्त्रक्रिया मात्र निश्चित म्हणतां आली असती."

जखमींचें प्रमाण वाढतच होतें. दुपारीं एक कुवार्ता कानीं आली. पुरवठा संपला होता. आतां ना भाकऱ्या, ना कालवण, ना कांहींच. केवळ मद्याच्या बाटल्यांचे तीन पेटारे तेवढे शिल्लक होते. पुढें काय?

"पेटारे फोडा आणि वांटा तें मद्यही." क्लारानें फर्माविलें. "ईश्वराला आपली पुढली काळजी!"

हें बोलतांनाच, पुढल्या खेपेला आपण अधिक पुरवठा बरोबर घेतला पाहिजे हें तिनें मनाशीं ठरवून ठेवलें. नंतर क्षणभरांतच, मद्याच्या पेटाऱ्यां-

बद्दल ते पाठविणारांना तिनें धन्यवाद दिले. कारण ते पेटारे भरतांना नेहमींप्रमाणें लांकडाचा रंधा नव्हे तर मक्याचें पीठ भरलें होतें! लागलींच त्याचें गरम गरम कालवण करण्यांत आलें. तें सहा भल्या मोठ्या किटल्या भरून झालें. मग क्लाराला सुचलें कीं शेतावरच्या घरांत तपास करावा. तिथें कांहीं हातीं लागेल. आणि खरेंच तिथें तीन पिंपें भरून पीठ आणि एक पोतें मीठ मिळालें. माघार घेतलेल्या कॉन्फेडरेट सैन्यानें हें तिथें पूर्वीं सांठविलें असावें. क्लाराला सोन्याची खाण हातीं यावी इतका हर्ष झाला. तिनें ईश्वराचे आभार मानले. आणि मनोमन खूणगांठ बांधली कीं प्रत्यक्ष युद्धक्षेत्रावर आणायची ती प्रत्येक वस्तू कांहीं ना कांहीं उपयोगाची असली पाहिजे. आयत्या वेळीं ती कामीं येते.

रात्र पडली. कोठींत कंदिल तेवूं लागले. क्लारा घराकडे गेली.

एका टेबलावर एक संपत असलेली मेणबत्ती मिणमिणत होती. जवळ मुख्य शस्त्रवैद्य एकटाच बसून होता. तशा अंधुक प्रकाशांतही त्याच्या मुद्रेवरचा विषाद, थकवा क्लाराला स्पष्टपणें दिसला.

"डॉक्टर, फार थकला आहांत तुम्ही." क्लारानें हळूवारपणें म्हटलें.

त्या काळच्या रीतीप्रमाणें शस्त्रवैद्य अभिवादनासाठीं किंचित् उभा राहून वांकला आणि मग सरळ होत त्वेषानें म्हणाला, "हो, थकलों आहे मी. विटलों आहें लष्करांतल्या या बेकदरपणाला, निर्दयपणाला! इथें निदान हजार जांया माणसं आहेत. रात्रींच योग्य ती काळजी घेतली नाहीं तर यांतलीं निदान पांचशें सकाळीं जिवंत दिसणार नाहींत. आणि आमच्यापाशीं ही एवढीच मेणबत्ती उरली आहे—हा दोन इंचांचा तुकडा—शेवटचाच!"

"जरा इकडे या, डॉक्टर." क्लारानें त्याला दाराशीं नेलें. समोर कोठींतून प्रकाशाचे उजळ किरण बाहेर लुकलुकत, झिरपत होते. "पाहिलंत?" तिनें विचारलें.

शस्त्रवैद्यानें केवळ मान हलविली. "पाहिलं." तो म्हणाला. "काय पहायचंय? काय आहे तिथं?"

"कंदील."

"कंदील! कुठले कंदील? कुणी आणले?"

" मी, डॉक्टर."

" कुठून ?"

" येतांनाच बरोबर घेतले होते ते."

" अस्सं. किती आहेत तुमच्याकडे ?"

" तुम्हांला पुरतील एवढे."

शस्त्रवैद्य झटक्यानें तिथून बाहेर गेला. त्यानें कंदील घेऊन वापरले परंतु पुन्हां या संबंधांत क्लाराकडे तो कांहींही बोलला नाहीं. ना कृतज्ञता, ना आभार, ना कौतुक. परंतु क्लारानें म्हटलें आहे, " याची फेड त्यांनीं पुढें दामदुपटीनें केली."

पुष्कळ वर्षांनीं एका शहरांत तिचें व्याख्यान चालू असतां तिनें बोलण्याच्या ओघांत हा प्रसंग सांगितला. आणि हा सांगून संपतांच श्रोत्यांतला एक गृहस्थ ताड्‌दिशीं उठून उभा राहिला.

" बाईसाहेब," तो म्हणाला, " मी तो शस्त्रवैद्य. तेव्हां तुमचे आभार मी मानले नसतील तर आतां मानतों आहे."

अँटिएटॅमची ती लढाई सूर्यास्तासरशीं थांबली. तोफा विसावल्या. दोहों पक्षांचीं सैन्यें रणांतून हटलीं. जवळ जवळ ८ मैलांच्या आघाडीवर केवळ प्रेतें आणि जखमी सैनिक उरले होते. चंद्रप्रकाशांत मग रात्रभर या भागांत शस्त्रवैद्य, स्ट्रेचरवाले, क्लारा आणि तिच्याबरोबरचीं चार माणसें आपलें कार्य करीत होतीं.

तिची जरूर होती आणि ती भागविण्याइतकें साहित्य जवळ होतें, तोंवर ती अँटिएटॅमलाच राहिली. मग ती पुन्हां खडतर प्रवास करीत माघारी वॉशिंग्टनला गेली. असिस्टंट क्वार्टर मास्टर जनरल कर्नल रकरना ती भेटली. तिची सारी हकिकत ऐकतांना त्या खंद्या लष्करी माणसाचे डोळेही पाणावत होते.

मग तिनें विचारलें, " कर्नलसाहेब, पुढल्या खेपेला मला पुरवठ्याच्या वहातुकीची कांहीं अधिक सोय करून द्याल का ?"

कर्नल रकर कबूल झाले.

क्लारा घरीं गेली आणि बिछान्याला टेकली तीच हिंवानें कुडकुडत, तापानें फणफणत.

● ● ●



## १४

कारा फार दिवस बिछान्याला खिळून राहिली नाहीं. शेनान्डो खोऱ्यांत लढाई पेटली आहे हें कानीं पडतांच ती खडखडीत बरी झाली आणि तिकडे गेली.

या खेपेला कर्नल रकरनें न विसरतां अधिक पुरवठ्याच्या वहातुकी-साठीं गाड्यांची व्यवस्था केली होती. यावेळीं कर्नल रकरनें क्लाराबरोबर जाण्यासाठीं माणसें नेमलीं त्यांना लढायांचा, प्रवासाचा वीट आला होता. दोन वर्षें त्यांनीं या लढाया आणि प्रवास करीत काढलीं होतीं. पुन्हां या भानगडींत पडायचें नाहीं अशी प्रतिज्ञा त्यांनीं मनोमन केलेली होती. आणि आतां क्लारा बार्टनबरोबर रणावर जाण्याचे कर्नल रकरचे हुकूम पहातांच त्यांच्या जिवाची तल्खी झाली. संताप झाला. कोण ही क्लारा बार्टन ? आणि काय म्हणून हिच्याबरोबर रणावर जायचें ? एका बाईचा अधिकार काय म्हणून चालवून घ्यायचा ?

हें क्लाराला माहीत नव्हतें. प्रत्यक्षांत या माणसांचें तऱ्हेवाईक वागणें पाहून ती मूढ बनली. तिला कळेना, हीं माणसें अशीं कां वागतात ?

प्रवासाच्या पहिल्या दिवशीं सारे चिडचिडलेले आणि मख्ख होते. दुपारीं चार वाजतां त्यांचें त्यांनींच, प्रवास थांबवून तळ टाकायचें ठरवलें. क्लाराचें म्हणणें, पुढें जाऊं या. तिच्या म्हणण्याकडे सर्वांनीं दुर्लक्ष केलें.

क्लारा संतापली नाहीं कीं चिडली नाहीं. मनाशीं हंसून ती म्हणाली, " मला पुन्हां शिक्षिका बनलं पाहिजे. "

तोंडांतून अवाक्षरही न काढतां त्या माणसांनीं खेचरें सोडलीं. त्यांना चारा दिला, पाणी पाजलें. एव्हांना क्लारानें कांहीं लांकडें गोळा करून त्यांची शेकोटी पेटवली होती. भरपूर आणि गरमागरम स्वयंपाक केला होता.

सारे ताव मारून जेवले. तिच्या नजरेला नजर मात्र कोणी देत नव्हता. जेवणें झाल्यावर सगळे लांब जाऊन घोळक्यानें बसले. फार न बोलतां, चलविचलित चेहऱ्यांनीं. अखेर एकजण उठला आणि क्लाराकडे गेला. पाठोपाठ कांहीं अंतर राखून उरलेले गेले.

" बाई," म्होरक्या चांचरत म्हणाला, " आम्ही—आम्ही एकूण बरं केलं नाहीं. चुकलं आमचं. आम्हांला क्षमा करा. सकाळपासून पिसाळ-ल्यागत वागलों आम्ही. पण तुम्ही माणसांसारखं वागवलंत आम्हांला. जेवण वाढलंत. गेल्या दोन वर्षांत असं रुचकर जेवण तोंडांत पडलं नव्हतं आमच्या. इतकं करूनसुद्धां कांहीं बोलला नाहींत तुम्ही आमच्या वागण्याबद्दल. फार मोठं अंतःकरण आहे तुमचं. आम्हांला माफ कराल ना ? आतां पुन्हां नाहीं असं पिशागत वागणं होणार ! "

क्लारानें अर्थातच क्षमा केली. शाळेंतल्या गुंड मुलांचे निष्पाप अपराध पोटांत घालावेत तसे तिनें या माणसांच अपराध पोटांत घातले. आनंदानें, समजूतदारपणें.

रात्रीं झोपण्याच्या वेळीं या माणसांचा म्होरक्या क्लाराच्या झोपण्याच्या गाडीकडे गेला. त्यानें तिथें दिवा लावला. अंथरूण घातलें. क्लाराला गाडींत चढायला मदत केली. मग गाडीचें कॅनव्हासचें दार बाहेरून घट्ट लावून घेऊन त्यानें आपलें अंथरूण तिथेंच खालीं पसरलें—गाडीच्या पायथ्याशीं. आणि तिथें तो पडला.

सकाळीं जाग आल्या आल्या क्लाराची न्यहारी तिच्यापुढें आली.

पुढें जवळ जवळ सहा महिने हीं माणसें क्लाराबरोबर होतीं. वाऱ्यावादळांत, खडतर प्रवासांत, प्रत्यक्ष रणधुमाळींत. त्यांनीं रुग्णांची सुश्रुषा केली, जखमींवर उपचार केले, मरणोन्मुख सैनिकांना त्यांच्या अखेरच्या क्षणीं सोबत केली आणि मृतांचे मरणोत्तर विधी केले. दिवसादिवसाला क्लारावरची त्यांची भक्ति बळावत होती.

शेनान्डोच्या लढाईंत तब्बल तीन आठवडे क्लारानें ऐन आघाडीवर आपलें कार्य बजावलें. नंतर कशानें तरी पुवाळणीला आलेल्या हातावरच्या शस्त्रक्रियेसाठीं ती वॉशिंग्टनला आली. आणि त्यांतून मुक्त होतांच ती तडक पुन्हां आघाडीवर गेली. आतां आघाडी व्हर्जिनियांतल्या फ्रेडरिक्सबर्ग नजीक सरकली होती. हा जवळ जवळ सारा भाग कॉन्फेडरेट सैन्यानें कबजांत घेतला होता.

खुद्द गांवाच्या एका बाजूला नदी वहात होती. या नदीअलिकडे संघराज्याच्या फौजा नदीवर एक तात्पुरता पूल बांधण्यासाठीं गोळ्यांच्या वर्षावांत झगडत, धडपडत होत्या. नदीपलिकडून, इमारतींच्या खिडक्यांतून बंदूकधारी कॉन्फेडरेट सैनिक संघराज्याचे तंत्रज्ञ आणि सैनिक नेमके टिपीत. खूप प्राणहानि झाली आणि अखेर एकदांचा नावांचा एक पूल तयार करण्यात आला. संघराज्याच्या फौजा गांवांत घुसल्या. कॉन्फेडरेट सैनिक कांहींसे मागें हटले. तरीही जवळ जवळ निम्म्या गांवावर त्यांनीं ताबा ठेवला.

दरम्यान लांकडी फळ्यांचा एक अधिक पक्का पूल नदीवर तयार झाला आणि तो पुरा होता होतांच संघराज्याचे आणखी सैनिक त्यावरून गांवावर घसरले.

घनघोर युद्ध जुंपलें. फौजेबरोबर नदीपलीकडे झालेल्या प्रमुख शस्त्रवैद्याकडून क्लाराकडे एक दूत दौडत आला. त्याच्याजवळच्या रक्तरंजित, चुरगळल्या चिटोऱ्यांत मजकूर होता. “इकडे या. तुमची जरूर इथें आहे.”

युद्धआघाडीवर स्त्रीला स्थान नसतें हें बहुधा त्या शस्त्रवैद्याला कोणी सांगितलेलें नसावें.

क्लाराच्या माणसांनीं समोर सणसणत्या गोळयांच्या वर्षावांतल्या डळमळीत लांकडी पुलाकडे पाहिलें. आणि उतरल्या, घाबरल्या चेहऱ्यांनीं ते क्लाराकडे पाहूं लागले. "बाई!" ते म्हणाले, "तुम्ही नका जाऊं! जाणं जिवावरचं ठरेल! आम्हांला पाठवा. आम्ही जातों—"

गाडींवरून क्लारानें सगळयांकडे पाहिलें. ती म्हणाली, "मलाच गेलं पाहिजे, बाबांनो. गेलंच पाहिजे मला!" समजूत पटवण्याचे प्रयत्न यानंतर व्यर्थ आहेत हें सगळयांनाच कळून चुकलें. तिच्या पाठोपाठ त्यांनीं डळमळत्या पुलावर पाऊल टाकलें. दोहों बाजूंना पाणी काडतुसांनीं फुटत, उसळत होतें. बालपणीं असल्याच ओंडक्यांच्या पुलावरून केलेल्या वाटचाली क्लाराला यावेळीं आठवल्या असतीलच असें नव्हे; मात्र तिच्याबरोबरचीं माणसें क्लाराचें चापल्य, तिची सावधगिरी पाहून थक्कच झालीं.

पैलतीराला पोंचतांच एका फौजी अधिकाऱ्यानें क्लाराला उतरवून घेण्यासाठीं हात पुढें केला. त्यानें हात उचलला आणि फुटलेल्या तोफगोळयाचा एक तुकडा दोघांच्या दरम्यान सणसणत गेला. क्लाराच्या झग्याचा एक शेव त्यानें छिन्नविच्छिन्न केला; त्या अधिकाऱ्याच्या कोटाचाही कांहीं भाग फाटून निघाला. तात्पुरत्या इस्पितळाच्या शोधांत क्लारा पुढें निघाली. अर्ध्याच तासानंतर त्या अधिकाऱ्याचें शव तिला स्ट्रेचरवरून आणलेलें पहायला मिळालें.

युद्ध अधिकाधिक घनघोर होऊं लागलें तसतसें प्रत्येक घराचें इस्पितळांत रूपांतर होऊं लागलें. अशा एका इस्पितळांतून दुसरीकडे जात असतां, संघराज्याची कुमक रस्त्यानें जाऊं देण्यासाठीं क्लारा रस्ता ओलांडायची थांबली. कुमकेच्या सैन्यदलांतल्या एका वयस्क अधिकाऱ्यानें तिला पाहिलें. त्याला वाटलें, ही कुणी गांवांतलीच स्त्री आहे.

त्यानें पलटण थांबवली. तो क्लाराकडे दौडत आला. घोड्यावरून वांकून त्यानें वत्सलपणें क्लाराला म्हटलें, "बाई, तुम्ही एकट्या आणि अशा धोक्याच्या ठिकाणीं दिसलांत. तुम्हांला संरक्षण हवं आहे काय?"
क्लाराला त्याच्या या प्रश्नाची मौज वाटली. तरीही त्या अधिकाऱ्याचे

तिनें आभार मानले. आपली ओळख न देतां तिनें स्मितपूर्वक त्याला दिलासा दिला कीं, " अमेरिकेंतली मी सर्वांत सुरक्षित बाई आहे. "

त्या वयस्क अधिकाऱ्याला याचा बोध झाला नाहीं. परंतु नजीकच खोळंबलेल्या पलटणींतल्या सैनिकांनीं मात्र क्लाराला ओळखलें. त्यांनीं तिच्या नांवाचा गजर केला. पलटणीमागून पलटणीनें हा गजर त्रिवार चालू ठेवला. आसमंत दुमदुमलें.

आणि मग त्या वयस्क अधिकाऱ्यालाहि क्लाराची ओळख पटली. शिरस्त्राण काढून त्यानें क्लाराला अभिवादन केलें. " आपण म्हणालांत तें रास्त आहे. " तो म्हणाला. आणि त्यानें घोड्याला टांच मारली.





# १५

फ्रेडरिक्सबर्गच्या लढाईचें पर्यवसान तहांत झालें. सबंध दोन वर्षांच्या युद्धांत पोटोमॅकच्या सैन्यानें केवळ एक विजय संपादिला होता—अँटिएटॅमचा. परंतु पश्चिमेकडे आणि टेनेसी आणि मिसिसिपी भागांत जनरल युलिसिस ग्रँटच्या फौजांनीं धीमेपणानें आणि एकसारखी प्रगति चालविली होती. संघराज्याच्या नौदलानेंही कॉन्फेडरेट राज्याचीं जवळ जवळ सर्व बंदरें रोखून धरलेलीं होतीं.

अँटिएटॅमनंतर, प्रेसिडेंट लिंकननें आपला सुप्रसिद्ध मुक्ततेचा जाहीरनामा ( Proclmation of Emancipation ) काढला. साऱ्या बंडखोर राज्यांतले गुलाम यापुढें स्वतंत्र झाल्याचें त्यानें जाहीर केलें. दक्षिणेंत, संघराज्याच्या फौजा नजीक येतांच मळयांवरचे गुलाम मळे सोडून फौजांत सामील होऊं लागले. मळे ओस पडूं लागले. ओसाड

होऊं लागले. त्यामुळें पिकें निघेनात. लष्करी आणि नागरी भागांची उपासमार होऊं लागली. घोडे, खेचरें, गुरें, सारीं सैन्यानें नेलीं होतीं. दक्षिणेकडल्या सुखवस्तू लोकांना भुकेची आंच जाणवूं लागली.

या सुमाराला क्लारानें आणखी दक्षिणेकडल्या फौजांबरोबर रहावयाचें ठरविलें. कारण त्या बाजूला युद्धाचें स्वरूप अधिक उग्र होतें. तिची अधिक जरूर तिथें होती.

व्हर्जिनिआंतल्या युद्धांत आतां ढिलाई येईल; कारण संघराज्याचे सेनापति चार्ल्स्टन काबीज करून पुढें दक्षिणेकडे अधिक आंत घुसूं इच्छितात, अर्थात् युद्धाचा खरा जोर यानंतर तिथेंच; असें क्लाराला सांगण्यांत आलें होतें.

तिनें आपलें कार्यक्षेत्र बदलण्याचीं आणखीही दोन कारणें होतीं. तिचा भाऊ डेविड आतां दक्षिण कॅरोलिनांत पोर्ट रॉयल येथें क्वार्टर मास्टर होता. आपल्या माणसापाशीं कांहीं काळ रहावें ही तहान क्लाराला अलिकडे लागलेली होती. दुसरें कारण म्हणजे संघराज्याच्या सैन्यांबरोबर ती दक्षिण भागांत घुसती तर कदाचित् तिच्या दुसऱ्या भावाचा-स्टीफनचा-ठावठिकाणा लागण्याचा संभव होता. जवळ जवळ वर्षभरांत त्याची कांहींच वार्ता नव्हती.

आणि म्हणून आपल्याला पोर्ट रॉयल येथें जाण्याची परवानगी मिळावी म्हणून तिनें युद्धखात्याकडे अर्ज केला. परवानगी लागलींच मिळाली.

पोर्ट रॉयलला जाण्यांत ती चुकली. तिच्या परिचयाचें पोटोमॅकचें सैन्य सोडून तिनें इतैत्र जायला नको होतें. ती गेली आणि गेटिसबर्गची घनघोर लढाई झाली. तिची खरी जरूर तिथें होती आणि ती होती पोर्ट रॉयलला. या नव्या ठिकाणीं तिचा सारा अनुभव तोकडा पडला. अनेक गोष्टी नव्यानें शिकण्याची वेळ आली.

इथें एकनिष्ठ माणसांबरोबरच्या लांबच लांब पदयात्रा नव्हत्या; ऐन धुमश्चक्रींत काम करायला तशा धुमश्चक्र्या नव्हत्या. अंग मोडून काम करण्यांतलें किमान सुखही नव्हतें. चार्ल्सटनचा वेढा पहात तब्बल आठ

महिने स्वस्थ बसावें लागलें. नित्याचें परिचाराचें काम होतें, तेवढेंच. आणि त्यासाठीं भरपूर परिचारिका होत्या.

क्वचित फार काम अंगांवर घेऊन ती स्वतःला थकवून घेई. परंतु हंमेशा तिला रुग्णशुश्रूषेचें साहित्य पुरवीत रिकामा वेळ कसाबसा घालवावा लागे. या कामाला तिची आवश्यकता नव्हती. यासाठीं स्त्रिया उपलब्ध होत्या.

तरी पण डेविडचा सहवास असल्यानें ती तशी सुखांत होती. पोर्ट रॉयलला इतर लष्करी अधिकाऱ्यांच्या बायकाही रहात होत्या. मेजवान्या होत, समारंभ होत. क्लाराला स्वतःचा एक घोडा होता आणि नियमानें ती त्यावरून रपेट मारून येई. हें सारें ठीक होतें. परंतु क्लाराची तृप्ति यांत नव्हती. क्लाराला हवें होतें तें हें नव्हे.

कांहीं वरिष्ठ वैद्यकीय अधिकारी एव्हांना क्लाराचा मत्सर करूं लागले होते. तो कां, हें आज सांगतां येत नाहीं. तिला फार मानसन्मान प्राप्त झाला होता हें कारण असूं शकेल; किंवा तिचें रुग्णपरिचर्येंतलें कसब हेंही या मत्सराचें कारण असूं शकेल. कदाचित्, हे अधिकारी कांहीं काळेंबेरें करूं पहात असतील आणि क्लाराला त्याचा सुगावा लागला असेल.

कारण कांहींही असो; या अधिकाऱ्यांनीं क्लाराविरुद्ध शक्य तेवढ्या कारवाया केल्या. त्यांनीं तिचे तंबू ताब्यांत घेतले, तिचा अन्नपुरवठा तोडला, तिच्याबद्दल कंड्या उठविण्यास सुरवात केली. आणि अखेर तिला उत्तरेकडे जाण्याच्या आज्ञा युद्धखात्याकडून मिळाव्यात यासाठीं त्यांनीं आपली सारी इभ्रत इरेला घातली. त्यांचे प्रयत्न यशस्वी झाले. आज्ञा सुटल्या. क्लारानें त्या अवमानिल्या. ती सरळ आपल्या गांवीं निघून गेली. त्या भागांतल्या सेनापतीची त्यामुळें तिच्यावरची मर्जी उडाली. तो रुष्ट झाला.

गांवीं तिनें कांहीं काळ विश्रांति घेतली. मग ती वॉशिंग्टनला गेली. परंतु स्पॉट्सिल्व्हानियाचें युद्ध भडकेपर्यंत तिची गरज तिथें कुणाला भासली नाहीं. फ्रेडरिक्सबर्गनजीकच हें नवीन रणकुण्ड पेटलें. जखमींना

फ्रेडरिक्सबर्गलाच नेण्यांत येत होतें. क्लारानें कर्नल रकरकडे परवान्यासाठीं धांव घेतली. त्यानें सहर्ष परवाना दिला. तिच्या कर्तृत्त्वाविषयीं आतां त्याच्या मनांत पक्का विश्वास निर्माण झाला होता.

क्लारानें माणसें जमवलीं, पुरवठा घेतला, आणि कर्नल रकरनें दिलेल्या गाड्यांवर तो लादून ती वॉशिंग्टनमधून निघाली. सारें पूर्वींसारखें वाटत होतें. ओळखीचें, संवयीचें होतें. तिची गरज असलेल्या जागीं ती आतां जाणार होती. तिच्या उपस्थितीला आतां मोल होतें. आतां तिला स्वस्थता वाटत होती, आत्मविश्वास वाटत होता. आतां क्षुद्र हेवेदावे, मत्सर, ढवळाढवळ, आणि छुपें वैमनस्य कामाआड येणार नव्हतें. आणि काम, भरपूर काम मिळणार होतें—ऐन धुमश्चक्रींत, तोफागोळ्यांच्या पावसांत, काडतुसांच्या वर्षावांत. तिला बरें वाटत होतें. त्या ओबडधोबड सडकांवरून हादरत, हिंदकळत युद्धआघाडीकडे जातांना तिचें मन आनंदानें उचंबळत होतें.

क्लाराला युद्धाची आवड होती, रक्ताची तहान होती, भेसुराची ओढ होती वा हिंसेची चटक होती असें मुळींच नव्हतें. उलट या साऱ्याचा तिला तिटकारा, राग, संताप होता. तिला आवड होती सेवेची. तिला ओढ होती, चटक होती, सेवेची. आणि युद्धाच्या विध्वंसक वातावरणांतच तिची ही ओढ, ही चटक पूर्णांशानें भागण्याजोगी होती.

फ्रेडरिक्सबर्गच्या बंदरावरच तिला खेचरांच्या २०६ गाड्या भेटल्या. यांत जखमी होते. त्यांना बोटीनें वॉशिंग्टनला पाठवायचें ठरलें होतें. गाड्या ढोपरभर राडींत रुतून पडलेल्या होत्या. जखमींना नव्हतें अन्न, नव्हतें पाणी. नव्हते वैद्यकीय उपचार. नित्याचीच कथा ही.

क्लारा या परिस्थितींतून मार्ग काढण्याला अनुभवानें शिकली होती. तिनें किंचित्काल फक्त, नेमकें कुठून काम सुरू करावें याचा विचार केला. आणि त्याच वेळीं एक सडपातळ तरुण तिच्यासमोर येऊन उभा राहिला.

तो धर्मोपदेशक होता. क्रिश्चन कमिशन या धार्मिक संस्थेनें आपल्या अनेकांसारखें त्यालाही आघाडीवर पाठविलें होतें. अत्यंत उत्साही अशा

तरुणांचा हा गट, उत्साह, थोडें फार कापडचोपड, आणि आणखी थोडेंसेंच कांहीं बरोबर घेऊन त्या आघाडीवर येऊन हजर झाला होता.

बिचकत बिकतच त्यांचा तो म्होरक्या क्लाराशीं बोलला. त्या गाड्यांतून जखमी असावेत असें तो म्हणाला. क्लारानें याला दुजोरा दिला आणि निदान रात्रीपर्यंत तरी ते सर्व जखमी सैनिक बोटीवर नेतां येणें शक्य होणार नाहीं असेंही ती म्हणाली.

"आम्हांला कांहीं जमेल का ?" त्यानें विचारलें.

"हो हो. त्या साऱ्यांना अन्नपाण्याची जरूर आहे, औषधोपचार हवे आहेत."

तरुणानें सहाय्याची सिद्धता दर्शविली; परंतु प्रत्यक्ष कार्याला नेमकी कशी सुरुवात करावी याची त्याला कल्पना नव्हती. मग क्लाराच्या मार्गदर्शनाखालीं त्यानें लाकूड फांटा गोळा केला, शेकोटी पेटविली. क्लारानें एक डझन मोठ्या भांड्यांतून ऊन ऊन कॉफी बनविली. कापडाचे दोन मोठे तुकडे काढून त्यांतला एक तिनें स्वतःच्या कमरेभोंवती बांधला. दुसरा तिनें त्या चकित तरुणाला बांधायला दिला. त्या कापडाचीं सुटीं टोकें एकत्र टोंचून मग तिनें मोठे पिशवीवजा कप्पे तयार केले. त्या कप्प्यांत तिनें शेंगा भरल्या आणि कॉफीचें भांडें उचललें. हें लक्षपूर्वक न्यहाळणाऱ्या त्या तरुणानें दुसरें भांडें उचललें. शेंगाहि घेतल्या. दोघें मिळून मग पुढें झालीं. क्लारा चिखलांत उतरली. तो तरुण मात्र थबकला. मदतीचा उत्साह असला तरी त्यानें या चिखलाचा विचार केलेला नव्हता. आतां तो गोंधळला, बावरला.

"आपण—आपण त्या गाड्यांपर्यंत जाणार कसे ?" त्यानें विचारलें.

"चालत." क्लारानें जबाब दिला आणि जवळ जवळ कमरेपर्यंत चिखलांत ती उतरली. पाठोपाठ तो तरुण धर्मोपदेशक मुकाट्यानें उतरला. क्लारानें याबद्दल नंतर म्हटल्याप्रमाणें, "लष्करी जीवनांतलें पहिलें पाऊल त्यानें टाकलें." तिच्याच म्हणण्याप्रमाणें, तो तरुण वरपांगी सडसडीत आणि नाजुक दिसत होता तरीही पुढें प्रत्यक्ष समरांगणांत तो

धीट आणि धीमा ठरला. तोफगोळयांच्या ऐन धुरांत तो न डगमगतां उभा ठाके.

पुन्हां एकवार फ्रेडरिक्सबर्गला रुग्णालयाची कळा आली. परंतु या खेपेला प्रमाण वाढतें होतें! शहरांतल्या नगरशेटींना जखमींबद्दल तमा वाटत नव्हती. ते म्हणत, " घाणेरड्या, कळकट मळकट, साध्या सोजिरांना घरांत आश्रय द्यायचा ? भलतेंच ! " शहराच्या नगरपित्याची कोणावर सक्ति करण्याची इच्छा नव्हती.

त्यानें खरोखरच कोणावर तिळमात्र सक्ति केली नाहीं. गाड्यांतल्या जखमींना त्या महाभागानें तळतळून मरूं दिलें. गांवांतल्या एका ओसाड मोडक्या घराच्या फरशीवर क्लाराला ५०० अर्धमृत सैनिक रक्तांत थबथबून 'पाणी' 'पाणी' करीत टाहो फोडतांना आढळले.

या भयंकर दृश्यानें क्लाराच्या सर्वांगाची लाही लाही झाली.

कार्यमग्न शस्त्रवैद्यांना या प्रकाराची अर्थात् कल्पनाही नव्हती. त्यांचें काम ठरलेल्या एका जागीं मान मोडून चाललें होतें.

क्लारानें हीं माणसें आपल्या सहकाऱ्यांकडे सोंपविलीं आणि चपळ घोड्यांची एक हलकी फुलकी गाडी मिळवून ती वॉशिंग्टनकडे दौडत सुटली. पहांट फटफटतां ती वॉशिंग्टनमध्यें आली. आणि आली तशीच सेनेट मिलिटरी कमिटीच्या प्रमुखाकडे गेली. सारी हकिगत तिनें त्याला निवेदिली. तात्काळ एक चौकशी समिति नेमून ती संबंधित स्थळाकडे धाडण्यांत आली. सकाळीं दहापर्यंत ते लोक फ्रेडरिक्सबर्गला पोंचले. दुपारपर्यंत शहरांतलें घर न् घर संघराज्याच्या सैनिकांना खुलें झालें. सरकारी कोठींतून अन्नपुरवठा करण्यांत आला.

या लढाईनंतर क्लारा वॉशिंग्टनला परतली ती विश्रांतीसाठीं महिनाभर तिथेंच होती. यादवी संपत आल्याचे अंदाज आतां तिला चौफेर ऐकायला मिळत होते. कॉन्फेडरेट फौजांची मनुष्यहानि अपरिमित झाली होती आणि नवीन सैन्यभरती नवीन माणसां-अभावीं शक्य नव्हती. उरले सुरले सैनिक चिकाटीनें लढत होते, परंतु ते अगदींच लक्तरें लोंबत असलेल्या, वखवखल्या,

स्थितीला आले होते. कॉन्फेडरेट राज्याची नागरी व्यवस्थाही कोसळायला आली होती. महागाई कमालीची वाढली होती. गोमांस आणि लोणी ३० डॉलर्सना रत्तलभर मिळे! चहाचा भाव झाला होता रत्तलाला ५०० डॉलर्स! पायताणांना पडत २०० डॉलर्स! लांकडी खडा-वांना जाजमांच्या चिंध्या ठोकून लोक पायताणें बनवीत. स्त्रियांना अब्रू-रक्षणासाठीं कापडाला वृत्तपत्राचे कागद जोडावे लागत!

या विपन्नावस्थेची नेमकी कल्पना उत्तरेकडल्या जनतेला नव्हती. क्लाराला तर नव्हतीच नव्हती. वॉशिंग्टनमध्यें ती विश्रांति घेत असतांच संघराज्याच्या एका सेनाविभागाच्या परिचारिका–विभागाची प्रमुख म्हणून काम करण्याची संधि तिच्यापुढें करण्यांत आली. संघराज्याच्या फौजांना आतां रिचमंडवर निर्णायक मोहीम करायची होती.

क्लारानें ही संधि बळकावली. तात्काळ ती दक्षिण व्हर्जिनियांतल्या पॉइंट ऑफ रॉक्स या ठिकाणीं जाऊन हजर झाली. सबंध कडाक्याचा उन्हाळा आणि कांहीं प्रमाणांत पावसाळा तिनें तेथें आपलें कार्य करीत निभावला.

तिच्या बेपत्ता भावाची--स्टीफनची--आणि तिची भेट झाली ती इथें.

संघराज्याच्या सैन्यानें त्याला कैद केलें होतें. आपण मनानें संघराज्याच्या बाजूचेच आहोंत हें त्याचें परोपरीचें सांगणें कोणालाही पटलें नव्हतें. त्याला कैद करण्यांत आलें तेव्हां तो आजारी होता. कैदेंत त्याची मनस्वी आबाळ झाली. त्याच्याजवळचे तीन सहस्र डॉलर्स संघराज्याच्या दोन अधिकाऱ्यांनीं बळकावले.

क्लाराची आणि त्याची भेट घडविण्यांत आली तेव्हां तो मरणोन्मुख अवस्थेंत होता. अत्यंत सावकाश त्याची प्राण–ज्योत मंदावत, थरथरत होती. त्याला कल्पनातीत त्रास होत होता. क्लारानें त्याची दिवसरात्र सुश्रुषा केली. अखेर त्याला वॉशिंग्टनमधल्या इस्पितळांत पाठविण्यांत आलें तेव्हां तीही त्याच्याबरोबर गेली. रिचमंडवर संघराज्याचें निशाण फडकण्याआधीं महिनाभर, मार्चमध्येंच, तो मरण पावला.

सहाच दिवसांनीं कॉन्फेडरेट सेनानी रॉबर्ट ली फौजेसह संघराज्याच्या

जनरल ग्रँटला शरण आला. यादवी वस्तुतः संपली. दक्षिणेंत कांहीं ठिकाणीं मात्र नंतरही कांहीं महिने झटापटी चालू होत्या.

स्टीफनच्या यातनामय दुर्दैवी मृत्यूनें कळवळलेल्या क्लाराला संघराज्याच्या विजयानें आनंद झाला परंतु तो भरल्या, पाझरत्या डोळ्यांनीं. तिचें वैयक्तिक जीवन आतां खिळखिळें झालें होतें. स्टीफन गेला होता. त्याच्या मरणाचें दुःख विसरूं पहावें तर युद्धही संपलें होतें. सबंध चार वर्षांच्या अविरत आणि अचाट कामानंतर आतां जीवनांत एक मोठी पोकळी निर्माण झाली होती. एक दरी.

पुढें काय ?





# १६

कलाराला फार काळ विचार करावा लागला नाहीं. तिनें युद्ध–आघाडीवर कामाला आरंभ केला तेव्हांपासून सैनिक तिला पत्रें लिहीत. आपला एखादा बेपत्ता आप्त वा मित्र तिला कोठें आढळतो काय याबद्दलच त्यांत बहुधा विचारणा असे. अशा कोणाबद्दल कांहीं कळलें तर तें कळविण्याची विनंति असे. हळू हळू सैनिकांची कुटुंबीय मंडळीही तिला या आशयाचीं पत्रें लिहूं लागलीं.

त्या काळांत, बेपत्ता सैनिकांचा तलास काढण्यासाठीं युद्धखात्याची वेगळी यंत्रणा नव्हती. मृत सैनिकांना त्यांचे सांगाती पुरत आणि वर ओबडधोबड थडग्यांवर त्या सैनिकांचीं नांवें लिहून ठेवीत. लिहिण्याची सोय उपलब्ध नसेल तेव्हां ते माघारी येतांच वरिष्ठ अधिकाऱ्यांना मृताचें नांव आणि ठावठिकाणा देत. निनावी थडग्यांखालीं या काळांत फार मृत देह पुरले गेले. त्यांच्या मृत्यूची वार्ताही कोणाला कळविली गेली नाहीं. आणखी अनेक सैनिक तर अक्षरशः गायबच राहिले. ते जिवंत आहेत वा मृत याचा कोणालाच पत्ता नव्हता. ते जखमी

होऊन रुग्णालयांत पडून आहेत वा वेड लागून देशोधडीं फिरताहेत, कीं शत्रु-कैदेंत बंदिस्त आहेत, याचाही कोणाला मागमूस नव्हता. त्यांच्या कुटुंबियांत अर्थात् मोठी घबराट आणि घालमेल होऊन राहिली होती.

स्टीफन असा बेपत्ता होता तेव्हां जीवाला लागत त्या कळा क्लारा विसरली नव्हती. तिनें असे जेवढे मिळतील तेवढे बेपत्ता सैनिक, जिवंत वा मृत स्थितींत, परंतु शोधून काढायचे ठरवले.

याच हेतूनें ती राष्ट्राध्यक्ष लिंकनला भेटली. लिंकननें तिचा उपक्रम मनःपूर्वक नांवाजला. युद्धखात्यानेंही सहकार्य द्यायचें ठरवलें.

लिंकननें तिला एक अनावृत्त पत्र लिहून दिलें; तें ती आतां साऱ्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करणार होती. ज्याला ज्याला एकाद्या बेपत्ता माणसाबद्दल कांहीं माहिती असेल वा माहिती हवी असेल त्यानें त्यानें क्लारा बार्टनकडे सत्वर कळवावें असें आवाहन त्या पत्रांत होतें. युद्धखात्यानें क्लाराच्या हवालीं एक तंबू केला, कांहीं सामानसुमान दिलें. थोडें लेखनसाहित्य आणि अगदीं थोडें टपालहंशील पुरविलें. सैनिक सैन्यांतून परत पाठविले जात त्या ॲनापोलिस गांवीं क्लारानें आपली कचेरी थाटली.

युद्धखात्याची ही 'काटकसर' चमत्कारिक आणि संकुचितपणाची वाटेल. परंतु क्लाराशिवाय कोणालाच त्या प्रचंड कामाच्या व्यापाची कल्पना आलेली नव्हती हेंही लक्षांत घेतलें पाहिजे.

क्लाराच्या वेतनाचा प्रश्नही युद्धखात्यानें विचारांत घेतला नव्हता. तिला लागणारा इतर खर्च, तिला लागणारे मदतनीस—यापैकीं कशा-चीही तरतूद युद्धखात्यानें केलेली नव्हती.

राष्ट्राध्यक्ष लिंकननें ही बेपर्वाई सहन केली नसती; परंतु त्याला याबाबत कांहीं माहितीच नव्हतें. याच सुमाराला एका नाट्यगृहांत एका माथेफिरू नटानें लिंकनचा खून केला; आणि नंतरच्या धांवपळींत आणि अंदाधुंदींत क्लाराचा विचारही कुणाला सुचला नाहीं.

दरम्यान तिच्याकडे प्रतिदिनीं शेंकड्यानें पत्रें येत होतीं आणि तिला एकटीला त्याबाबत कांहीं करणें शक्य नव्हतें. दहाबारा मित्रमैत्रिणींनीं

आणि खुद्द तिच्या बहिणीनें—सॅलीनें—तिच्या या कामांत तिला मदत करण्याची उत्कट इच्छा व्यक्त केली परंतु त्यांचें काम घ्यायचें तर त्यांना कांहीं ना कांहीं वेतन दिलें पाहिजे. क्लारा याबाबत सॅलीकडे बोलली. आपल्या शिलकी पुंजींतून हा सारा खर्च चालविण्याची क्लाराची कल्पना ऐकून सॅली सुन्न झाली.

क्लारानें नकार दिल्यानें सोन्याच्या शोधांत वनवासांत जाऊन गब्बर होऊन आलेल्या तरुणानें, तिचा पुन्हां नकार ऐकून, तिच्या खात्याला बँकेंत १०,००० डॉलर्स भरले होते. त्याचा उल्लेख मागें आलाच आहे. हे १०,००० डॉलर्स अद्याप बँकेंत तिच्या खात्याला पडून होते. व्याज चढून आतां त्यांचे १५,००० डॉलर्स झाले होते.

क्लारानें हे पैसे काढून आपल्या कार्यार्थ वापरायला सुरुवात केली. सहा एक महिन्यांत तिनें ५,००० हून अधिक डॉलर्स खर्च केले. वर्षभरांत खातें रिकामें झालें. आतां अमेरिकन कॉंग्रेसकडे याचना करणें भाग होतें.

कॉंग्रेसनें तिचे स्वतःचे १५,००० डॉलर्स लागलींच परत केले. आणि काम पुढें चालू ठेवण्यासाठीं तिला आणखी १५,००० डॉलर्स मिळण्याची व्यवस्था केली.

क्लाराच्या कार्याचें फळ कल्पनेपलिकडे मोठें मिळालें.

क्लारानें आपल्या कामाची राज्यवार विभागणी केली होती. त्या त्या राज्यांतल्या नापत्ता सैनिकांची यादी तिनें तयार केली होती. त्या त्या राज्याची यादी त्या त्या राज्यांतच 'याबाबत माहिती असल्यास कळवा' अशा शीर्षकानिशीं प्रसिद्ध करण्यांत येत होती.

पत्रांचा वर्षाव होत होता. सैनिक आपल्या परिचयाच्या नापत्ता सैनिकांची माहिती अगत्यानें कळवीत होते. यादीनुसार नापत्ता झालेल्या परंतु एव्हांना स्वगृहीं वा इतरत्र सुखरूप असलेल्या सैनिकांचीं पत्रेंही येत होतीं. अशा कोठें ना कोठें पत्ता लागलेल्या सैनिकांचे आप्त त्यांच्याबाबत लिहून कळवीत होते.

एकेक धागा जोडीत जोडीत क्लारानें जवळ जवळ २२,००० मृत वा

जिवंत सैनिकांचा पत्ता लावला. याशिवाय जॉर्जियामध्यें अँडर्सनव्हिल येथें १४,००० थडगीं सांपडलीं. इथें यादवीच्या काळांत कॉन्फेडरेट सैन्याच्या युद्धबंद्यांचा तळ होता.

हीं थडगीं कशीं सांपडलीं त्याची हकिकत अशीः कॉनेक्टिकटच्या टेरीव्हिल गांवच्या डॉरेन्स ॲटवॉटर नांवाच्या तरुण सैनिकानें ही हकिकत क्लाराकडे कळवली. अठराव्या वर्षी तो संघराज्याच्या सेनेंत दाखल झाला; युद्ध-आघाडीवर कैद झाला आणि त्याला अँडर्सनव्हिलला पाठविण्यांत आलें. त्याचें हस्ताक्षर चांगलें असल्यानें—त्या काळांत टाइपरायटर्स अस्तित्वांत नव्हते—तुरुंगाधिकाऱ्यानें त्याला तुरुंगांतील मृत्यूंची नोंद करण्याचें काम सांगितलें. पुढें साऱ्या दक्षिण भागांत अन्नधान्याचा दुष्काळ झाला आणि खुद्द कॉन्फेडरेट सैन्याला बरें अन्न मिळेना. तुरुंगांत मग उपासमार आणि रोगराई सुरू झाली. कैदी जीव-जंतूसारखे मरूं लागले. ॲटवॉटरच्या मतें, तुरुंगाधिकारी मुद्दाम उपासमार घडवीत होते. तुरुंगाधिकाऱ्यांच्या अधिकृत नोंदीपलिकडे तुरुंगांतल्या मृत्यूंची ॲटवॉटरनें एक स्वतंत्र, गुप्त नोंद ठेवण्यास सुरुवात केली. ही नोंद तो कोटाच्या शिवणींत लपवून ठेवीत असे. यादवी संपतांच तो तुरुंगांतून मुक्त झाला आणि स्वग्रामीं आला—त्या नोंदीसह. एका चिल्लर सरकारी अधिकाऱ्याला ही नोंद त्यानें दाखविली परंतु त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें. मग ॲटवॉटरनें क्लाराच्या कार्याबद्दल ऐकलें आणि स्वतःजवळची ती नोंद त्यानें तिच्याकडे आणली. तिनें ती सहर्ष स्वीकारली आणि त्या तरुण माणसाला धन्यवाद दिले. त्या एका नोंदींत १४,००० नांवें होतीं !

क्लाराच्या खटपटीनें मग सरकारनें ॲटवॉटर आणि आणखी बरींच माणसें मदतीला देऊन क्लाराला अँडर्सनव्हिलला त्या १४००० थडग्यांच्या शोधांत पाठविलें.

काम अवघड होतें. अभद्र आणि जिवाचें पाणी करणारें होतें. परंतु अत्यंत निग्रहानें या सगळ्यांनीं कष्ट करून एका पडीक जागीं हीं थडगीं शोधून काढलीं.

क्लाराला अद्यापही कोणी वेतन देत नव्हतें. सतत चार वर्षें तिनें या कामाच्या पाठपुरावा केला होता. हें करीत असतांना उपजीविकेसाठीं कांहीं अर्थार्जन करणें अवश्य होतें. दर हिंवाळ्यांत कांहीं दिवस ती आपले युद्धविषयक अनुभव व्याख्यानरूपानें गांवोगांवीं सांगूं लागली. पूर्वेकडलीं आणि मध्यपश्चिमेकडलीं जवळ जवळ सर्व राज्यें तिनें या कार्यक्रमांत पायांखालीं घातलीं. लोक तिचें व्याख्यान ऐकण्यासाठीं गर्दी करीत. व्यासपीठावर येतांना अद्यापही तिला कांपरें भरे, परंतु आतां कोणालाही त्याचा सुगावा लागत नसे. तिनें या व्याख्यानांनीं भरपूर पैसे कमाविले—आणि त्यांतले भरपूर आपल्या विहीत कार्यार्थ खर्च केले.

चार वर्षें हें सारें व्यवस्थित चाललें. चार वर्षांनंतर एका हिंवाळ्यांत पोर्टलँड, मेन, येथें रात्रौ तिचें व्याख्यान होतें. सभागृह श्रोत्यांनीं फुललें होतें. सरावाप्रमाणें क्लारा व्यासपीठावर आली. आपले टिपणांचे कागद तिनें नीटनेटके केले. श्रोतृवर्गाकडे एक सस्मित कटाक्ष टाकला आणि बोलण्यासाठीं तोंड उघडलें. परंतु शब्द उमटला नाहीं.

आवाज पुन्हा गेला होता.





# १७

तो सबंध हिंवाळा क्लारा नरम होती. परंतु लोकांनीं तिला विश्रांती मिळूं दिली नाहीं. ही बाई काय वाटेल तें करून दाखवते ही तिच्याविषयींची समाजांतली श्रद्धा बळावली होती. आयोवामधल्या पोडुंक गांवच्या गांवकऱ्यांना राष्ट्राध्यक्षाला भेटायचें असलें तर ते येत क्लाराकडे; कुणाचा तरी भाचा किंवा पुतण्या तुरुंगांतून सोडवायचा असला तरी मनधरणी क्लाराची—तिला त्रास! आया तिला मुलांसाठीं रोजगाराची खटपट करायला सांगत. बायका नवऱ्यांना कुठें नोकरी पहायला तिला विनवीत. पैशांसाठीं तर किती तरी माणसें येत. या साऱ्या बाजारबुणग्यांत अनेकदां क्लाराचे आप्तमित्रही असत हें विशेष.

हिंवाळा संपून वसंत आला तरी क्लाराची तब्बेत नादुरुस्त आणि आवाज निकामी होता. तिच्या डॉक्टराचा धीर सुटला, आत्मविश्वास डळमळला. त्यानें तिला परदेशीं जाण्याला बजावलें. 'या देशांत तुम्हांला विश्रांती मिळणें शक्य नाहीं' असें तो म्हणाला. तीन वर्षें क्लारानें अमेरिकेबाहेर पूर्ण स्वस्थ रहायचें असा कार्यक्रम त्यानें क्लाराला आंखून दिला.

बिचाऱ्या डॉक्टरला क्लाराची पुरी कल्पनाच नव्हती.

डॉक्टरांची आज्ञा क्लारानें प्रमाण मानली. विरोध करण्याचें बळ तिच्यांत उरलें नव्हतें. तिनें आवराआवर सुरू केली. एकटीला जाववेना म्हणून बहिणीला, सॅलीला आग्रह चालविला.

क्लाराचें वय आतां ४७ वर्षांचें होतें. प्रकृति नादुरुस्त होती. परंतु ती दिसे मात्र तिशींतली तरुणी.

सॅलीला घेऊन ती स्कॉटलंडला गेली. कांहीं दिवस दोघी तिकडेच प्रवास करीत होत्या. त्यानंतर सॅली अमेरिकेला परतली. क्लारा मग लंडनला, तिथून जिनेवाला गेली. तिथेंच तिनें वास्तव्य करायचें ठरवलें. उन्हाळयांत जिनेवाची हवा मोठी आल्हादकारक असते. क्लाराचे कांहीं परिचतही तिथें तेव्हां रहात होते. आणखी ओळखी झाल्या, संबंध जडले. कांहीं दिवस मोठे समाधानांत गेले.

थंडी पडूं लागतांच तिला पुन्हा एकएकटें वाटूं लागलें. ती ऊब शोधीत कॉर्सिकाकडे गेली. परंतु तिथेंही तिला हवें तें आढळेना म्हणून ती फ्रान्समार्गें पुन्हा स्वित्झर्लंडमध्यें आली.

चार वर्षांच्या बेचैन भ्रमंतीचा हा कुठें आरंभ झाला होता. पुढलीं चार वर्षें तब्बेत नादुरुस्त राहिली, कांहीं कसोटीचे प्रसंग आले आणि बेचैनी वाढत राहिली. नाहीं म्हणायला फ्रँको-प्रशियन युद्धाचें एक वर्ष तेवढें क्लाराच्या तब्बेतीला उजवें गेलें. ती चौफेर भ्रमत होती. इकडून तिकडे, तिकडून इकडे. पुन्हा आणखी कोठें तिसरीकडे. कुठें सहा महिने रहा तर कुठें एकाच महिन्यांत मुक्काम आवर. राजेरजवाड्यांना भेट, प्रेक्षणीय स्थळें पहा, असें करीत तिनें फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड, इटाली, स्वित्झर्लंड, असे उलट सुलट प्रवास आरंभिले.

ती युरोपला गेल्यानंतर दुसऱ्याच वर्षीं युरोपमध्यें फ्रान्स आणि जर्मनीच्या दरम्यान युद्ध भडकलें. फ्रँको-प्रशियन युद्ध या युद्धांत जखमींच्या व्यवस्थेचें काम सुरू करण्याची सूचना येतांच क्लाराची खिन्नता पळाली. नैराश्य मावळलें. प्रकृति सुधारली. ती या नवीन कार्यार्थ स्ट्रॉसबर्गकडे गेली. या युद्धांत आपल्याला आघाडीवर जायला मिळावें म्हणून क्लारानें फार खटपट केली; परन्तु ही अमेरिका नव्हती. हा होता युरोप. आघाडीवर

जाण्याची परवानगी एकदांची मिळाली तरी तिची सोबत करण्यासाठीं कुणी बरोबर यायला तयार होईना.

अखेर, अँटोइनेट मारगॉट नांवाच्या तरुण स्विस मुलीला सोबत घेऊन क्लारा आघाडीकडे निघाली. एकदां आघाडीवर पोंचल्यावर आपल्याला कामाला कोणी आडकाठी घेणार नाहीं अशी तिची कल्पना होती. मार्गांत रस्ते अडलेले पाहून तिनें बरोबर घेतलेली खेचरांची गाडी मागें ठेवली आणि ती पायी पुढें निघाली. हीच चूक झाली; कारण आभाळांत जमूं लागलेलें मळभ तिच्या वा अँटॉइनेटच्या नजरेस आलें नव्हतें. आकाश काळवंडलें, दाटलें. मोठें वादळ झालें. मोठा पाऊस पडला. दोघी भिजून चिंब झाल्या. हुडहुडल्या. पुढें हांकेवर एक खेडें दिसत होतें तिकडे दोघी धांवल्या. परन्तु त्या भागांत त्या नवख्या होत्या. युद्ध चालूं होतें. कोणीच त्यांना घरांत घेईना. एका खाष्ट दिसणाऱ्या खाणावळवालीनें अखेर त्यांना रात्रीपुरता आसरा द्यायचें मान्य केलें. तिनें दोघींना आंत ओढून दार लावून घेतलें. आंत मद्य घेऊन तर्र झालेले जर्मन सैनिक सर्वभर पसरले होते. तो गुत्ता होता.

या नवीन दोघी कोणी परकी हेरच असल्या पाहिजेत याविषयीं त्या सैनिकांची खात्री झाली. मध्यस्थ म्हणून एक इंग्रजी जाणणारा नागरी इसम उपस्थित नसता तर क्लाराला त्यांनीं चांगलेंच छळलें असतें.

आपला येण्याचा हेतु क्लारा या मध्यस्थामार्फत त्यांना समजावून सांगत असतांना मद्य पिऊन बेहोष झालेला एक जर्मन कार्पोरल आंत आला आणि त्याचें लक्ष क्लाराकडे गेलें. गुत्त्यांतली तो नोकराणी असावी अशा समजुतीनें त्यानें तिला मद्य आणायला फर्माविलें. क्लारानें नकार दिला. त्यानें पुन्हां एकवार फर्माविलें. क्लारानें पुन्हां नकार दिला.

एक डरकाळी मारून त्यानें कमरेची तलवार उपसली आणि तिच्या पात्याचें अग्र क्लाराच्या उराशीं टेकवून क्लाराला मागें भिंतीकडे हटवीत नेलें.

तो तलवार तशी धरून उभा होता. भिंतीला टेकलेल्या क्लाराला कपड्यांतूनही तलवारीचें तीक्ष्ण अग्र टोंचत होतें. सबंध घर स्तब्ध होतें. माणूस आणि माणूस थरारला होता.

क्लारानें एकदां उरावर टेकलेल्या त्या शस्त्राकडे आणि मग त्या सैनिक–अधिकाऱ्याकडे आपल्या तळपत्या नजरेनें पाहिलें. किंचित्काल नजरेला नजर भिडली. त्या अधिकाऱ्यानें नजर वळविली. तलवार हलविली. म्यान केली. आणि तो पाय आपटीत निघून गेला. याचा जास्त विचार करण्यासाठीं क्लारा थांबली नाहीं. तिच्या बरोबरची स्विस मुलगी मूर्च्छित झाली होती.

रात्रीं दोघी ढेंकूण आणि चिलटांनीं भरलेल्या फाटक्या तुटक्या चिरगुटांच्या बिछान्यावर आडव्या झाल्या. दिवसां मध्यस्थ म्हणून उपयोगी पडलेल्या इसमानें रात्रीं खिडकीवाटें त्यांच्या खोलींत घुसण्याचा प्रयत्न केला. दोघीही जाग्या असल्याचें पाहून तो थबकला. आणि दोघींना सोबत म्हणून आपण जमिनीवर एका कोपऱ्यांत निजायला आलों आहोंत असें कांहीं तरी तो सांगूं लागला.

क्लाराच्या कोवळ्या सांगातिणीला, अँटॉइनेटला, त्याच्या हेतूची कल्पना न आल्यानें, ती त्याचे आभार मानूं लागली. त्यानें खिडकीवाटें एक पाय आंत सोडला आणि क्लारानें उठून बसून बजावलें, "आंत याल तर प्राण घेईन तुमचा."

तो माणूस तसा अडाणी नव्हता. तो त्वरेनें नाहींसा झाला.

आघाडीवर जाण्याचे जास्त प्रयत्न सोडून देऊन दोघी दुसऱ्याच दिवशीं परत फिरल्या.

तरी पण युद्ध चाललें असतां क्लाराला निष्क्रीय रहाणें शक्य नव्हतें. ती कांहीं युद्ध-आघाड्यांवर पोंचलीही—परंतु प्रत्यक्ष युद्ध संपल्यानंतर.

त्या उन्हाळ्यांत आणि पुढें जवळ जवळ हिंवाळाभर ती गांवोगांव अन्न, कपडालत्ता आणि पैसे मागत हिंडली.

स्ट्रॅसबर्गमध्यें तिनें महिला कार्यालय स्थापन केलें, यांत ३०० हून अधिक गरीब गुरीब महिलांना शिवणकाम पुरविलें जाऊं लागलें. या कामासाठीं कापड मिळेल तेथून जमविण्यांत येत होतें. कामाबद्दल प्रत्येक स्त्रीला वेतन दिलें जात होतें. आणि तयार होत ते कपडे युद्धामुळें बाताहत झालेल्या गृहहीन निराश्रितांना वाटण्यांत येत होते.

क्लाराची तब्येत या काळांत खूपच सुधारली. तिच्या स्ट्रॉसबर्ग येथील कार्याबद्दल जर्मन सम्राटानें तिला पदक देऊन तिचा सन्मान केला. ' दि आयर्न क्रॉस ऑफ मेरिट फॉर लेडीज् ' हें या पदकाचें नांव. ह्यातींत नंतर तिनें अशीं एकूण २७ पदकें मिळविलीं. त्यांतलें हें पहिलें.

योगच असा आला होता कीं क्लारा जर्मन पक्षांत जमा झाली होती. वास्तविक कोण कुणाशीं लढतें याला तिच्या हिशेबीं महत्त्व नव्हतें. जय कोणाचा होतो याविषयींही तिला उत्सुकता नव्हती. आपद्ग्रस्तांना मदत आणि अपंगांना आधार एवढींच तिचीं विशुद्ध उद्दिष्टें होतीं. तीं साध्य झालीं.

पुढें पॅरिसमध्यें तिनें अशाच स्वरूपाचें कार्य केलें.

फ्रान्स आणि जर्मनीमधलें हें युद्ध ओसरत आलें. आणि क्लाराची तब्येत ढांसळली. दृष्टी बिघडली. डोळ्यांना नीट दिसेना. क्लारा जवळ जवळ आंधळी झाली.

डोळ्यांवर उपचार चालू असतांनाच तिला एक सुवार्ता कळली. व्याख्यानें देऊन जमविलेल्या आणि मग गुंतविलेल्या तिच्या पैशांची किंमत वाढत वाढत आतां तिला पुढली चिंता करण्याचें कारण उरलें नव्हतें. युरोपचाही आतां तिला कंटाळा आला होता. तब्येत कधीं नव्हे इतकी अस्थिर बनली होती. पुन्हां एकवार तिनें प्रवासांत मन गुंतवून बघितलें पण चैन पडेना. तिला घराची ओढ लागली होती. मायदेशाची ओढ लागली होती.

ती अमेरिकेला गेली. घरीं गेली. मनाची एक तहान तृप्त झाली. परंतु कुठें तरी कोरड जाणवत होती.

युरोपमधला तिचा फिरतीचा काळ तसा कारणीं लागला होता. खूप पहायला मिळालें होतें, शिकायला मिळालें होतें. युरोपमध्यें अस्तित्वांत असलेल्या ' इंटरनॅशनल रेड क्रॉस ' नांवाच्या संघटनेची माहिती तिला मिळाली होती. या संघटनेचें प्रत्यक्ष कार्य तिनें थोडें फार पाहिलें होतें. तिला अशा संघटनेची उपयुक्तता पटली होती.

परंतु आतां तिचें वय झालें होतें बावन्न वर्षांचें. ती थकली होती. तब्येतीच्या बाजूनेंही दुबळी झाली होती. डोळे अधू झाले होते.





१८ क्लाराच्या युरोपमधल्या आरंभाच्या काळांत तिचा एका भल्या गृहस्थांशीं परिचय झाला. डॉ. लुइ अपाया असें त्यांचें नांव. रेड क्रॉसच्या आंतरराष्ट्रीय समितीचे ते सदस्य असल्याचें तिला कळलें होतें. दोघांच्या पहिल्याच भेटींत डॉ. अपाया यांनीं क्लाराला विचारलें, "जिनेवाच्या करारांत तुमची अमेरिकाही कां सहभागी होत नाहीं ?"

"हा जिनेवाचा करार काय आहे ?" क्लारानें विचारलें.

"रेड क्रॉसबद्दल तुम्हीं कांहीं ऐकलें आहे का ?"

"तुम्ही त्याचे सदस्य आहांत एवढ्यापुरतेंच."

डॉ. अपाया हंसले. ते म्हणाले, "पुन्हां येईन तेव्हां आमच्या रेड क्रॉसबद्दलचं कांहीं वाङ्मय तुमच्यासाठीं आणीन. तेव्हांच आपण सविस्तर बोलूं."

ते पुन्हां आले तेव्हां क्लाराला रेड क्रॉस चळवळीची सारी हकिकत ऐकायला मिळाली. रेड क्रॉसचा एक प्रणेता हेन्री ड्युरंट याची हकिकत ऐकतांना, ओळखीच्या खुणांनीं ती थरारली. हा हेन्री ड्युरंट मूळचा

स्विस. तो इटालींत गेला असतांना फ्रान्स आणि ऑस्ट्रिया यांच्या दरम्यानची सॉल्फेरिनोची अटीतटीची लढाई त्यानें प्रत्यक्ष पाहिली. लढाईनंतर रणांगणावर तडफडणाऱ्या जायां सैनिकांची दुरवस्था पाहून त्याच्या काळजाचें पाणी पाणी झालें. तीन दिवस आणि तीन रात्री त्यानें या माणसांची सुश्रुषा करीत वेंचल्या. पुढें तो मोठा पैसेवाला झाला. परंतु ही लढाई विसरला नाहीं. हे तीन दिवस, या तीन रात्री तो विसरला नाहीं. बरेच दिवस तो याबद्दल विचार करीत होता. नंतर त्याच्या दृष्टीनें वजनदार अशा चार गृहस्थांशीं त्यानें बोलणें केलें. या चौघांत डॉ. अपाया होते.

या पांचांनीं मिळून एका संघटनेचा संकल्प सोडला. ही संघटना आंतरराष्ट्रीय असणार हें या संघटनेचें एक उद्दिष्ट असणार होतें. या उद्दिष्टाच्या दिशेनें या पांचांनीं एक करार तयार केला. यावर सहभागी राष्ट्रांच्या सह्या घेण्यांत यायच्या होत्या.

"रेड क्रॉस हेंच नांव कां ठेवलंत या संघटनेला?" क्लारानें विचारलें.

खिडकींतून दिसणाऱ्या स्विस निशाणाकडे डॉ. अपायांनीं क्लाराचें लक्ष वेधलें. त्यावर लाल पार्श्वभूमीवर पांढरा 'क्रॉस' फडकत होता.

"आम्हांला आमचें असें कांहीं प्रतीक हवें होतें." डॉ. अपाया म्हणाले. "दुरूनही चट्दिशीं ओळखूं येणारें. स्वित्झर्लंडबद्दल आम्हांला आदर होताच. आम्ही स्विस निशाणांतले रंग फक्त उलट केले. पांढऱ्या पार्श्वभूमीवर लाल क्रॉस."

क्लाराचा लाल रंग मनापासून आवडता. ती म्हणाली, "छान आहे तुमचं प्रतीक आणि नांवही."

रेड क्रॉस संघटनेच्या कराराच्या शर्ती फार सरळ आणि साध्या होत्या. रेड क्रॉसचें प्रतीक दाखविणाऱ्या कुठल्याही इस्पितळावर गोळया वा तोफा झाडण्यांत येऊं नयेत. शस्त्रवैद्य, परिचारिका, आदि या संघटनेचीं माणसें तटस्थ समजण्यांत यावींत. त्यांना कोणताही पक्ष न स्वीकारतां काम करतां यावें. खाजगी रीत्या जखमींची सुश्रुषा करणाऱ्यांना लष्करी संरक्षण देण्यांत यावें.

जिनेवा येथें सहभागी राष्ट्रांची एक बैठक घेण्यांत आली. तिथें २२ ऑगस्ट १८६४ या दिवशीं १२ राष्ट्रांनीं करारावर सह्या केल्या. अमेरिका, इंग्लंड, स्वीडन, आणि सॅक्सनी या राष्ट्रांनीं आपले प्रतिनिधि पाठविले होते; परंतु सह्या करण्याचा अधिकार त्यांना नव्हता. ते केवळ करार आपापल्या राष्ट्राच्या सरकारला सादर करणार होते. त्यानंतर आणखी दहा राष्ट्रांनीं करारावर सह्या केल्या. वर दिलेलीं बहुतेक सर्व राष्ट्रें यांत होतीं. नव्हती फक्त अमेरिका.

अमेरिकेच्या प्रतिनिधीनें कराराबाबत बराच उत्साह दाखविला होता परंतु अमेरिकन सरकार बाजूला राहिलें होतें.

"कां ?" डॉ. अपायांनीं सवाल केला.

"मलाही कल्पना येत नाहीं." क्लारा म्हणाली.

तिला बऱ्याच दिवसांनंतर कळलें तें असें कीं कराराची प्रत प्रतिनिधीनें गृहमंत्र्यांकडे दिली परंतु गृहमंत्र्यांनीं तिचें पुढें कांहींही केलें नाहीं. त्यांच्या मतें हा प्रयत्न चांगला असला तरी तो युरोपपुरता आणि युरोपीय युद्धांपुरताच मर्यादित होता. अमेरिकेला या दोहोंशींही कर्तव्य नव्हतें. म्हणून त्यांनीं त्या कराराचा अधिक विचारही केला नाहीं. कॉंग्रेसला वा अमेरिकन जनतेला या कराराची त्यांनीं अवाक्षरानें माहिती दिली नाहीं.

युरोपमधल्या क्लाराच्या चार वर्षांच्या वास्तव्यांत क्लारा आणि डॉ. अपाया यांच्या बऱ्याच भेटी झाल्या. दर वेळीं रेड क्रॉसबद्दल बोलणें होई. फ्रँको–प्रशियन युद्धांत तिनें या संघटनेचें कार्य प्रत्यक्षच पाहिलें होतें आणि ती भारून गेली होती. तिची जरूर त्या युद्धांत कुणाला भासली नाहीं त्याचें एक कारण ही संघटना युद्धआघाड्यांवर कार्यप्रवण होती.

तिला कळलें कीं, फ्रान्सनें जर्मनीविरुद्ध युद्धाची घोषणा केली आणि पंधरवड्याभरांत स्वित्झर्लंडमधल्या या संघटनेच्या कचेरींत युद्धआघाडी-वरील कार्याची सज्जता झाली. साहित्य जमलें. स्वयंसेवक युद्धआघाड्यांकडे रवाना झाले. या संघटनेच्या करारावर सही केलेल्या प्रत्येक राष्ट्रांत या संघटनेची एकेक राष्ट्रीय कचेरी होती. गांवागांवांतून या संघटनेच्या कोठ्या होत्या; त्यांत साहित्य जमविलेलें असे.

स्वित्झर्लंडमधल्या संघटनेच्या कोठीला क्लारानें भेट दिली. आणि तेथलें कार्य पाहून ती थक्क झाली. " एवढें अद्ययावत्, उपयुक्त साहित्य एवढ्या मोठ्या प्रमाणांत जमविलेलें मी प्रथमच पहात होते " असें तिनें म्हटलें आहे.

निव्वळ साहित्याच्या सांठ्याबाबतच नव्हे तर त्या सांठ्याच्या वांटपांतही ही संघटना चोख आणि तत्पर होती. युद्ध पेटलें कीं पुरवठा घेऊन स्वयंसेवक उपस्थित होत. शस्त्रवैद्य येत, मजूर पाठविण्यांत येत, परिचारिका उपलब्ध होत. जखमींची व्यवस्था टापटिपीनें करण्यांत येई.

एवढें सारें इतक्या सुरेख पद्धतीनें चाललें असतांना फ्रँको–प्रशियन युद्धांत क्लाराची गरज कोणाला भासली नाहीं, यांत आश्चर्य तें कसलें ?

तिला मायदेशाच्या आठवणी येत. तिथें युद्ध पेटलें कीं सारी धांवपळ होई. पुरवठा आघाडीवर पोंचेपर्यंत दिरंगाईनें नाहक मनुष्यहानि घडे. अँटिएटॅम, फ्रेडरिक्सबर्ग, पॉटसिल्व्हानिया येथल्या लढाया स्मरत. इकडे घनघोर लढाई घुमत असतांना वॉशिंग्टनमध्यें पुरवठा वहातुकीची सोय शोधत अडलेला असे.

रेड क्रॉस संघटनेबाबत क्लारानें खूप विचार केला.

ती मायदेशीं निघाली तेव्हां डॉ. अपाया तिला निरोप देण्याला आले होते.

" तुमच्या सरकारकडे रेड क्रॉसबद्दल कांहीं खटपट कराल का ? " त्यांनीं विचारलें.

" जमेल तेवढी. " क्लारानें उत्तर दिलें. खटपट करण्याचें तिच्या मनांत होतें परंतु अंगांत बळ उरलें नव्हतें. मनाला उभारी नव्हती.

रेड क्रॉस संघटनेचा परिचय अमेरिकेला करून द्यायचा, ही संघटना अमेरिकेंत रुजवायची, तर फार विचार आणि योजकतेची आवश्यकता होती.

क्लाराला यांतलें कांहीं शक्य नव्हतें. तिला आत्मविश्वासच नव्हता.

● ● ●



## १९

**घ**रीं येण्यांत, असण्यांत मोठें सुख होतें. घराची ऊब, घरांतला आराम, आणि घराबद्दलचा जिव्हाळा, यामुळें क्लाराला एक वेगळीच तृप्ति वाटत होती. पण हें सुख, ही तृप्ति फार काळ टिकली नाहीं. सॅली अचानक निवर्तली. बहिणीच्या निधनाच्या धक्क्यानें क्लारा हादरली, खिळखिळी झाली. मनोमन हजार मरणें मेली. घरांतलें एकेक माणूस चाललें होतें. आतां उरलीं होतीं डेविड आणि क्लारा. डेविडची तब्येत नीट नव्हतीच.

बहिणीच्या निधनाच्या धक्क्यानें क्लारा आजारी पडली. बरीच आजारी पडली. कुणालाही तिला भेटण्याला मनाई करण्यांत आली. स्वतःची सही करण्याचीही शक्ति तिच्या हातांत उरली नव्हती. तिला यांतून बरें केलें मिना कुफर नांवाच्या बाईनें. ही तरुण स्विस बाई अँटॉइनेट मारगॉटप्रमाणेंच फ्रँको-प्रशियन युद्धाच्या निमित्तानेंच क्लाराच्या परिचयांत आली होती. क्लाराला तिनें जर्मन शिकविलें होतें. क्लारानें तिला न्युमोनियांतून बरें केलें होतें.

क्लारा अतिशय आजारी असल्याचें कळतांच ही मिना कुफर तात्काळ बोट पकडून अमेरिकेला आली. अनेक वर्षें मग ती क्लाराबरोबरच होती.

प्रथम परिचारिका आणि मैत्रिण म्हणून, मग गृहिणी म्हणून. ही बाई वृत्तीनें मोठी तरतरीत, उल्हसित होती. उत्कृष्ट परिचारिका होती. क्लाराला तिनें बरें केलें इतकेंच नव्हे तर तिचा हरवलेला आत्मविश्वास तिच्यांत कांहीं अंशी पुन्हा निर्माण केला.

तो फार नव्हताच. कुणी तरी क्लाराला डेन्सव्हिल, न्यूयॉर्क इथल्या सॅनिटोरिअममध्यें राहून तेथल्या औषधी पाण्याचा उपचार करून घेण्याला सांगितलें. हें सांगणारी बाई अनुभवी होती. तिच्या शब्दाखातर क्लारा डेन्सव्हिलला गेली. इथें सारें वातावरण कसें आल्हादकारक होतें. अन्न साधेंच पण चविष्ट होतें. सॅनिटोरिअममधलें वातावरण असें कीं रुग्णाला वाटावें, आपण निश्चित बरे होणार. क्लारा इथें हळू हळू सुधारली. अंवती भंवतीच्या व्यवहारांत तिला रस वाटूं लागला. जगण्यांत अर्थ वाटूं लागला. तिचे लागेबांधे डेन्सव्हिलमध्यें इतके जुळले कीं सॅनिटोरिअममधून जायचें ठरल्यावर तिनें तिथेंच गांवाबाहेर कांहीं जमीन खरेदी केली. घर बांधलें. पुढें दहा वर्षें ती या घरांत राहिली.

रेड क्रॉस संघटनेविषयींचा विचार याही काळांत तिच्या मनांत जागा होता. या संघटनेंत कांहींतरी उणें आहे एवढें तिला जाणवत होतें. परंतु तें काय ? तिचें तिलाही तें ठरवितां येत नव्हतें. कधीं तरी तें शोधून काढायचें हा ध्यास मात्र लागलेला होता.

नंतर वर्षभर ती याच मनःस्थितींत होती. दरम्यान डॉ. अपाया यांच्याशीं तिचा पत्रव्यवहार चालूच होता. डॉक्टरांनीं तिला आपल्या संघटनेची अमेरिकेंतली प्रतिनिधि नेमली होती आणि अमेरिकेंत तिनें संघटनेची शाखा चालू करावी असा आग्रह चालविला होता. अशी शाखा काढायची झाल्यास काय काय करावें लागेल याबाबत सूचना दिल्या होत्या. चांगलीं आणि उत्साही माणसें—विशेषतः डॉक्टर्स—भोंवती जमवण्याबाबत लिहिलें होतें.

डॉक्टर अपायांच्या सूचनांबाबत विचार करीत असतांनाच तिच्याकडे एक तरुण इसम आला. ज्युलिअन हब्बेल असें त्याचें नांव. डॅन्सव्हिलच्या शाळेंतला तो रसायनाचा अध्यापक होता. युद्धकाळांत

सैन्यभरतीच्या वेळीं त्याचें वय लहान असल्यानें तो भरती होऊं शकला नाहीं, युद्धआघाडी पाहूं शकला नाहीं. परंतु त्यानें वर्तमानपत्रें वाचलीं होतीं. क्लाराविषयीं त्यानें ऐकलें होतें. तिचें युद्धकाळांतलें सुश्रुषा–कार्य, तिचें अतुल धैर्य त्याला ऐकून आणि वाचून माहीत होतें. क्लाराविषयीं त्याच्या मनांत मनस्वी पूज्यभाव रुजला होता. क्लारा त्याची देवता झाली होती.

आपला 'ईश्वर' इथें डॅन्सव्हिलमध्येंच वास्तव्य करून आहे हें कळतांच तो तांतडीनें भेटीस आला. वारंवार मग दोघांच्या भेटी घडल्या. क्लारानें आपल्या मनांतला रेड क्रॉस चळवळीचा विचार त्याच्यापाशीं बोलून दाखविला. तो तरुण भारून गेला. आपली मदत त्यानें या कल्पनेच्या मूर्ततेसाठीं देऊं केली.

"मला काय सांगतां करायला ?" त्यानें विचारलें.

अद्याप कशालाच क्लाराच्या मनांत स्पष्ट आकार आला नव्हता. तब्येत तशी पूर्णांशानें सुधारली नव्हती. ती म्हणाली, "डॉक्टर व्हा तुम्ही. म्हणजे जास्त उपयोग करून घेता येईल तुमचा."

ज्युलियन हब्बेल डॉक्टर झाला. डॉक्टर होता होतांच तो क्लाराचा उजवा हात आणि जिव्हाळयाचा स्नेही बनला. क्लाराच्या अखेरीपर्यंत त्यानें तिची सोबत केली.

तो वैद्यकीय शिक्षणासाठीं मिशिगनच्या विश्वविद्यालयांत असतांनाच क्लारानें आपली योजना प्रत्यक्षपणें हातीं घेतली. प्रथम जिनेवाच्या रेड क्रॉस करारावर अमेरिकन सरकारचें शिक्कामोर्तब मिळविणें जरूर होतें. त्यासाठीं राष्ट्राध्यक्ष, मंत्रिमडळ आणि कॉंग्रेसकडे रदबदली करणें अवश्य होतें.

ती वॉशिंग्टनला गेली. सर्वांना भेटली. सर्वांना तिनें आपलें मनोगत समजाविलें, सहकार्याची विनंति केली. आणि निराश होऊन ती गांवीं परतली.

कुणीच लक्ष घालायला तयार नव्हतें. कचेरींतून कचेरीकडे तिला 'टपाल' करण्यांत आलें. प्रत्येक अधिकारी खांदे उडवून दुसऱ्या कोणा

अधिकाऱ्याचा निर्देश करीत होता. मंत्री, लोकसभेचे सदस्य, यांनीं भेटी ठरविल्या आणि मोडल्या. ' विसरलों ' ही मोठी सबब होती. क्लाराला अशा वागणुकीची संवय नव्हती. साऱ्या अनुभवांतून तिला एक सांपडलें. रेड क्रॉस संघटनेंत नेमकें उणें होतें तेंच.

या संघटनेचें कार्य केवळ युद्धकाळापुरतेंच मर्यादित होतें; शांततेच्या काळांत या संघटनेला काम नव्हतें, कार्यक्रम नव्हता, उद्दिष्ट नव्हतें.

सरकारी वर्तुळांतून या उणीवेचाच उल्लेख जाणतां अजाणतां उमटत राहिला. ' युद्ध ' हा शब्द ऐकला कीं जो तो आंबट तुरट चेहरा करी. ' अमेरिकेला मुळीं आतां युद्धच नको. मग युरोपांतल्या युद्धांच्या या लफड्यांत आम्ही काय म्हणून अडकायचें ?' असा सर्वांचा युक्तिवाद. ' आमच्या अमेरिकेंत युद्ध झालें तेव्हां युरोपांतल्या राष्ट्रांनीं थोडेंच त्यांत लक्ष घातलें ?' असा साऱ्यांचा सवाल.

क्लारा मनाशीं म्हणाली, " इथें रेड क्रॉस संघटना व्हावयाचीच तर ती प्रथम राष्ट्रीय आणि मग आंतरराष्ट्रीय असली पाहिजे. आणि युद्धाव्यतिरिक्त इतर आपत्तींतही तिचा उपयोग झाला पाहिजे. शांतता–कालांतही तिचें कार्य चालूच राहिलें पाहिजे. "

तिनें इतिहासांत लक्ष घातलें. अमेरिकन जनतेवर कसकशा आणि किती आपत्ती किती व्यापक स्वरूपांत या काळांत ओढवल्या त्याची मनाशींच नोंद घेतली. दरसाल निदान एक तरी मोठी आपत्ती ओढवतेच असें तिला दिसून आलें. पूर, वादळें, आगी, धरणीकंप, रोगांच्या साथी आणि अवर्षणें–आपत्तींचे हे नाना प्रकार. विध्वंसाचीं , हानीचीं हीं नाना मुखें.

याबाबत तरी कांहीं केलें पाहिजे हें संरकारला पटायला हरकत दिसत नव्हती.

जवळच्या रेड क्रॉस जाहीरनाम्यावर तिनें एक कलम लिहिलें; "वारंवार ओढवणाऱ्या राष्ट्रीय स्वरूपाच्या व्यापक विपत्तींत वित्त, परिचारिका, वैद्यकीय तज्ज्ञ, साहित्य, अशा सर्व प्रकारचें सहाय्य पद्धतशीर रीत्या आपल्या शाखांमार्फत देशभर पुरवता यावें हाही रेड क्रॉस संघटनेचा उद्देश राहील. "

हा जाहीरनामा आणि रेड क्रॉसवरची एक स्वलिखित पुस्तिका बरोबर घेऊन क्लारानें आपले प्रयत्न नव्यानें चालू केले.

हें कार्य धीमें—अगदीं निरुत्साही वाटावें इतक्या धीम्या गतीचें होतें. परंतु तें सफल झालें. क्लाराचें दैव उजळलें. यादवी युद्धांत सैनिकांची एक संघटना जन्मास आली होती. तिचें नांव 'ग्रँड आर्मी ऑफ दि रिपब्लिक' किंवा 'जी. ए. आर.'. तिचीं उद्दिष्टें राजकीय होतीं. क्लाराच्या प्रयत्नांना या संघटनेनें पाठिंबा दिला.

या संघटनेच्या मेळाव्यापुढें क्लाराला बोलायला सांगण्यांत आलें. तिनें रेड क्रॉस चळवळीचा युरोपांतला सर्व इतिहास या मेळाव्यापुढें कथन केला. स्वतःचा अनुभव सांगितला. तिला म्हणायचें होतें तें जाणणारा, उमजणारा श्रोतृसमुदाय समोर होता. एकमतानें या मेळाव्यानें रेड क्रॉस संघटनेच्या अमेरिकेंतल्या मुहूर्तमेढीला पाठिंबा जाहीर केला.

वृत्तपत्रांनीं मग क्लाराचें कार्य उचलून धरलें. याचीही फार गरज होतीच.

राष्ट्राध्यक्ष गारफील्डनें हें सर्व वाचलें, ऐकलें. त्याला याबाबत अधिक जाणून घेण्याची इच्छा झाली. क्लाराला त्यानें बोलावून घेतलें. कॉंग्रेसपुढें आपण तिच्या प्रयत्नांची कथा आणि उद्दिष्टें ठेवूं असें आश्वासन दिलें. परंतु या प्रकरणीं प्रत्यक्ष कांहीं करण्याआधींच एका बिथरलेल्या सत्ता-पिपासू इसमानें त्याचा बळी घेतला.

क्लारा डॅन्सव्हिलला परतली. पुन्हां सारें 'मागील अंकावरून पुढें चालू' असा याचा अर्थ तिनें काढला होता.

डॅन्सव्हिलच्या नागरिकांना क्लाराची ही निराशा सहन झाली नाहीं. क्लारा त्यांची देवता होती. त्यांच्या गांवची रहिवासी होती. क्लाराबद्दल त्यांना अतिशय अभिमान होता. त्यांनीं ठरवलें कीं सरकार कांहीं करत नाहीं तर नाहीं. ठीक आहे! आपल्या गांवांतच करूं आरंभ. प्रथम आपलीच होऊं दे रेड क्रॉस संघटना! याविरुद्ध तर कायदा नव्हता!

गांवकऱ्यांचें एक शिष्टमंडळ क्लाराला जाऊन भेटलें. आपली इच्छा त्यांनीं क्लाराच्या कानांवर घातली.

क्लाराला बरें वाटलें. तिला उमेद आली. तिच्या मार्गदर्शनाखालीं गांवकऱ्यांनीं स्थानिक रेड क्रॉस संघटना उभारली. अमेरिकेंत रेड क्रॉस चळवळीची हीच मुहूर्तमेढ.

ही संघटना जेमतेम उभी रहाते न रहाते तों मिशिगननजीक मोठा वणवा पेटला. पांच सहस्र जीव निराधार झाले. भाजून मेलेल्यांची गणतीही अशक्य झाली.

क्लारानें, अद्याप मिशिगनच्या विश्वविद्यालयांत वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्या ज्युलियन हब्बेलला तार केली आणि वणव्याच्या ठिकाणीं जाण्यास सुचविलें. तिथें किती आणि कसल्या सहाय्याची गरज आहे याचा अंदाज घेऊन क्लाराला तो कळवायचा, असें काम हब्बेलकडे होतें. त्यानें तें तत्परतेनें आणि चोख बजावलें.

डॅन्सव्हिलची रेड क्रॉस संघटना सहाय्यार्थ सज्ज झाली--साभिमान.

डॅन्सव्हिलच्या गांवकऱ्यांचें हें सूत्रबद्ध आणि चांगलें कार्य पाहून रॉचेस्टर आणि सिरॅक्युजच्या नागरिकांनीं वणव्यांतल्या निराधारांसाठीं निधी जमवला आणि आपापल्या रेड क्रॉस संघटना बनविल्या. मिशिगन-वर मदतीचा वर्षाव झाला. अखेर, याहून अधिक मदतीची गरज उरलेली नाहीं, असें मिशिगनच्या गव्हर्नरांना जाहीर करावें लागलें.

अमेरिकेंत सर्वत्र आतां रेड क्रॉसच्या अस्तित्वाची आणि उपयुक्ततेची जाणीव झाली होती.

क्लारानें आपल्या रेड क्रॉसविषयक पुस्तिकेची नवीन, सुधारलेली आवृत्ति काढली आणि ती विक्रीसाठीं बाजारांत टाकली. वृत्तपत्रांनीं या पुस्तिकेची तोंड भरून स्तुति केली. पुस्तिकेचा प्रचंड खप झाला.

हा सारा गवगवा एव्हांना वॉशिंग्टनपर्यंत पोंचला होता. रेड क्रॉसकडे तुच्छतेनें, उपेक्षेनें पहाणाऱ्या कॉंग्रेस-सदस्यांनाही आपल्या उपेक्षेचा मनोमन फेरविचार करावा लागला.

या सुमाराला, क्लाराच्या यशानें तिच्यावर जळूं लागलेल्या अनेक स्त्रियांनीं वेगळया मदत-संघटनांचे सवते सुभे उभारले. कांहीं काळ क्लाराला यांचा त्रास झाला. परंतु अखेर या ‘ कुत्र्याच्या छत्र्या ’ आपोआप सुकल्या, नाहींशा झाल्या.

क्लाराच्या साऱ्या धडपडीला खरें यश आलें १८८२ च्या मार्चच्या पहिल्या तारखेला. या दिवशीं राष्ट्राध्यक्ष आर्थर यांनीं जिनेवाच्या करारावर सही केली आणि तो सीनेटकडे शिक्कामोर्तबासाठीं पाठवला.

सीनेटमध्यें त्यावर चर्चा चालूं असतांच, मिसिसिपी नदीला महापूर आला आणि जीवित आणि वित्त यांची मनस्वी हानि झाली.

बाल्यावस्थेंतच असलेल्या रेड क्रॉस संघटनेला या आपत्तीशीं मुकाबला करण्याला आवश्यक त्या सज्जतेला अवकाशच सांपडला नाहीं. क्लारानें अमेरिकन जनतेला उद्देशून एक ‘अपील’ प्रसिद्ध केलें. वृत्तपत्रांनीं त्याला पुष्टी दिली. मदतीची रीघ रेड क्रॉस संघटनेकडे लागली. अन्न, कपडे, औषधें, झाडांचीं रोपें, नांगर, असें विविध साहित्य आणि भरपूर पैसा देशभरच्या जनतेकडून आला. मग क्लारा कांहीं कार्यकर्त्यांना आणि हब्बेल ( हा आतां डॉक्टर झाला होता. ) ला घेऊन विध्वंसाच्या जागीं गेली. जवळ जवळ चार महिने त्या भागांत तिनें काम केलें. याचा परिणाम म्हणून मेम्फिस, व्हिक्सबर्ग, न्यू ऑर्लिन्स या शहरांतून रेड क्रॉस संघटनेंत अंतर्भूत होण्यासाठीं विचारणा आल्या. तिथें स्थानिक संघटना उभारण्यांतही आल्या.

सीनेटच्या मंजुरीनंतर २६ जुलै या दिवशीं राष्ट्राध्यक्ष आर्थर यांनीं जिनेवा करारांत अमेरिका सहभागी झाल्याचें जगाला जाहीर केलें. या वेळीं क्लारा वॉशिंग्टनमध्यें होती. तिचीच नेमणूक अमेरिकन रेड क्रॉसची अध्यक्षा म्हणून करण्यांत आली.

क्लाराच्या मनोकामना आतां कोठें भरीव स्वरूपांत पुऱ्या होऊं लागल्या होत्या.

• • •



# २०

अमेरिकन रेड क्रॉस संघटनेच्या अध्यक्षपदावरून क्लारानें अनेक वर्षे केलेल्या कार्याची तपशीलवार नोंद करायची झाल्यास त्याचा एक वेगळा ग्रंथच होईल. किंबहुना असा ग्रंथ स्वतः क्लारानें लिहिलाच असून 'दि रेड क्रॉस' असें त्याचें साधें नांव आहे. ७०० पृष्ठांचा हा ग्रंथ आहे.

हा अनेक वर्षांचा अवधि येथें केवळ ढोबळ नोंदीच्या स्वरूपांतच मांडणें भाग आहे. वाचतांना त्या धांवत्या नोंदीमागें एक खुजी, नाजुक, सुंदर आणि उमेदीची स्त्री वाचकांनीं गृहीत धरायची आहे. विलोल डोळ्यांची कर्तृत्वशालि बाहुली. तिचें नांव क्लारा बार्टन.

वादळें, आगी, महापूर, लढाया, अवर्षणें हें सारें वाचलें कीं आपल्याला वार्तापटांतलीं या स्वरूपाचीं भीषण दृश्यें आठवतात. कांहीं आठवणी, कांहीं अनुभवही जागे होतात. किंचाळणाऱ्या सोंसाट्याच्या वातचक्रापुढें प्रचंड वृक्ष उन्मळून कोसळत आहेत, फुगलेलें लाल लाल पाणी फोंफावत, गरगरत, मार्गांतलें सारें ओढून, हिस्कावून, कुस्करून नेत आहे, भल्या मोठ्या वणव्याचा काळा धूर मैलोगणती दाटून जीव-मात्राला श्वास अशक्य करून टाकतो आहे,—नाना स्मृति, नाना अनुभव.

हें सारें आठवा. यांत क्लाराला उभी करा. खुरटी, नाजुक शरीरयष्टीची ही एवढी एवढीशी बाई, विध्वंसाचे ढिगारे तुडवते आहे, राडींत आणि सांडपाण्यांत झोंपते आहे, उन्हांत करपते आहे, पावसांत भिजते आहे, धुरांत गुदमरते आहे,–वारंवार. चिकाटीनें, निश्चयानें, उमेदीनें. आणि हिचें वय काय? करा सुरुवात साठापासून. मग सत्तरी. मग पंचाहत्तरी. आणि ऐंशीचा आंकडा उलटला तरी हेंच! असेंच!

या वयाची ही बाई जिथें जिथें गेली तिथें तिथें तिनें मानवता पोंचविली. व्यवस्था पोंचवली. तत्परता पोंचवली. आराम पोंचवला. आणि हें सारें 'रेड क्रॉस'च्या निशाणाखालीं.

ही घ्या नोंद.

१८८१ मिशिगनचा वणवा.
१८८२ मिसिसिपीला महापूर.
१८८३ मिसिसिपीला महापूर.
१८८३ लुइजिआना आणि मिसिसिपीचीं वादळें.
१८८४ ओहियो आणि मिसिसिपीचे पूर.
१८८५ टेक्सासचा दुष्काळ.
१८८६ चार्ल्स्टनचा भूकंप.
१८८८ माउंट व्हर्नान, इलिनॉइस इथलें वादळ.
१८८८ फ्लॉरिडांत पीतज्वराची साथ.
१८८९ जॉनस्टाउनचा महापूर.
१८९२ रशियांत दुष्काळ.
१८९३ पोमरॉय, आयोवा येथें वादळ.
१८९३–९४ दक्षिण कॅरोलिना बेटांवर तुफान आणि समुद्राचें पाणी शिरलें.
१८९६ तुर्कस्तानांत अमेरिकनांची कत्तल.
१८९८–९९ क्युबासाठीं सहाय्य.
१८९८ स्पॅनिश–अमेरिकन युद्ध.
१९०० गॅल्व्हेस्टन, टेक्सास इथलें तुफान आणि समुद्राचें पाणी शिरलें.
१९०४ पेनिन्सिल्वानियांतल्या बटलर गांवीं टायफॉइडची सांथ.

क्लारा आणखीही कांहीं कार्य करीतच होती. मॅसॅच्युसेट्स येथील बायकांच्या रेफर्मेटरीची मेट्रन म्हणून तिनें सहा महिने काम केलें. ती व्याख्यानें देई. पुस्तकें लिही. आपल्या गांवांत तिनें, विकल्या गेलेल्या वडिलार्जित जमिनीपैकीं कांहीं जमीन पुन्हा खरेदी करून उन्हाळयाचे कांहीं दिवस तिथेंच व्यतीत करायला सुरुवात केली. वॉशिंग्टनमध्यें तिनें घर घेतलें. अनेकवार तिनें युरोपच्या वाऱ्या केल्या. जॉन्स्टाउनच्या पुराच्या वेळीं गृहहीनांसाठीं झोंपड्या बांधून उरलेलें लांकूड तिनें वॉशिंग्टननजीक मेरीलॅंडमधल्या ग्लेन एको या गांवीं पाठविलें आणि तेथें रेड क्रॉसची मुख्य कचेरी उभारली. तिथेंही ती बऱ्याच वेळा वास्तव्य करून असे.

सार्वजनिक कार्याच्या धांवपळींतही घर, संसार, आवडते पाळीव प्राणी, दीनदुबळयांना वैयक्तिक मदत, स्वयंपाकपाणी, हें सारें तिचें चालूच असे.

परंतु हें फार काळ जमण्यासारखें नव्हतें. ऐंशीचा पल्ला उलटला होता. थकवा जाणवे. विश्रांतीची फार गरज भासे. तरीही तिशीच्या बायांना लाजवील असा अद्याप तिचा उत्साह होता. आपल्याला विश्रांति लागते याचेंच तिला आश्चर्य वाटे. आपल्या वृद्धत्वाच्या जाणीवेनें मग ती विमनस्क होई.

यांत भर म्हणून रेड क्रॉस संघटनेंत हेवेदावे उद्‌भवले. अनेक स्त्रियांना या वाढत्या, सामर्थ्यशालि संघटनेचें अध्यक्षपद हवें होतें. क्लारालाही व्याप झेपत नव्हताच. ती केव्हांही त्यागपत्र देऊन खुषीनें निवृत्त होण्याला राजी होती. परंतु मग कुजबुज सुरूं झाली. कानगोष्टी पसरूं लागल्या. क्लारा बार्टनला संघटनेची आर्थिक व्यवस्था हल्लीं जमेनाशी झाली आहे, तिला सारासार विचार कसा तो उरलेला नाहीं, संघटनेसाठीं वाऱ्या-वादळांतून दौरे काढण्याचें बळ तिच्यांत उरलें आहे कोठें, अशा स्वरूपाच्या या कानगोष्टी होत्या.

अखेरची गोष्ट क्लाराला कांहीं अंशी मान्य होती. परंतु उरल्या आरोपांनीं ती जिव्हारीं दुखावली. मात्र ती खचली, घायाळ झाली नाहीं. तिचा पिंडच लढाऊ होता. तिनें अध्यक्षपदाशीं दाटून राहून प्रतिकाराला आरंभ केला. तिचाच अखेर विजय झाला. रेड क्रॉस संघटनेची तहहयात अध्यक्षा म्हणून तिची निवडणूक झाली.

आणि क्लारानें आपलें त्यागपत्र सादर केलें.

अध्यक्षपद सोडून ती स्वस्थ बसली नाहींच. वुइमेन्स रिलिफ कॉर्प्स या वेगळ्या संघटनेंत तिनें बरेंच कार्य केलं, ७०० पृष्ठांचा रेड क्रॉसचा इतिहास लिहिला, व्याख्यानें दिलीं, मेजवान्यांना ती उपस्थित असे, आप्त नातलगांच्या भेटीगांठी घेई—एकंदरीनें ती याही स्थितींत उमेदींत, मजेंत आणि लगबगींत होती.

परंतु दिवस ढळला होता. यात्रा संपत आली होती. क्लाराला हें मनोमन समजत होतें, पटत होतें. आपला कार्यभाग जवळ जवळ संपला आहे हें तिला दिसत होतें. आतां अखेरच्या क्षणासाठीं ती तयार होती. संतोषपूर्वक.

नव्वदाव्या वर्षीं तिनें मृत्युपत्र केलें. कुणाला कांहीं देण्यासारखें जवळ फारसें नव्हतेंच, कारण सारेंच दिलें होतें. सारेंच द्यायचें हाच स्वभाव रहात आला होता.

मृत्युपत्र करून मोकळी होतांच ती दैनंदिन जीवनांतून बाजूला सरकूं लागली. जगाच्या भल्याबुऱ्या व्यवहारांपासून अलिप्त होऊं लागली. तरीहि प्रत्येक गोष्टींत ती रस घेऊं शकत होती. जीवनाबद्दलचें प्रेम कायम होतें. शेजाऱ्याचें नवजात अर्भक असो कीं राष्ट्रीय महत्त्वाचा राजकीय प्रश्न असो, क्लारा त्यांत मनःपूर्वक परंतु अलिप्तपणें लक्ष घालीत होती.

त्या हिंवाळ्यांत तिला न्युमोनिया झाला. परंतु ती बरी झाली. पुन्हा पुढल्या वर्षीं न्युमोनिया झाला. हा डबल न्युमोनिया ठरला. हीच अखेर ठरली.

ग्लेन एको इथें १२ एप्रिल १९१२ या दिवशीं तिचें अवसान झालें. एक भाचा आणि डॉ. ज्युलिअन हब्बेल असे दोघे तिच्यापाशीं या वेळीं होते.

त्या अखेरच्या क्षणीं, भ्रमांत क्लारा पुन्हा युद्धक्षेत्रांत, तोफखान्याच्या धुरांत आणि दुःखितांच्या किंकाळ्यांत श्रमत, वावरत होती. अँटिएटॅम, फ्रेडरिक्सबर्ग, चांटिली...ती बिछान्यांतून वारंवार उसळत होती, उठत होती. तिला आवरणाऱ्यांना अनावर होत होती. म्हणत होती, "मला सोडा! मला जाऊं द्या! मला सोडा!"

ती मेली. 